

रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांच्या
उदार आश्रयाखालीं प्रसिद्ध होणारी
वीरशैवलिंगिब्राह्मण
धर्मग्रंथमाला.

ग्रंथ ४ था.

( व्यासकृत स्कंदपुराणस्थ शंकरसंहितामध्यपठित )

# वीरमाहेश्वर प्रकरणम्

हा
महाराष्ट्र भाषांतरासह
वेदमूर्ति मणूर मठाध्यक्ष
मल्लिकार्जुनशास्त्री यांनीं
सोलापूर येथें
" कल्पतरु " छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

आवृत्ति १ ली. प्रती ५००

शके १८२४ सन १९०२



किंमत ०८ आणे.

# प्रस्तावना.

धर्मास जेव्हां ग्लानि येते, तेव्हां धर्मसंस्थापक उत्पन्न होऊन धर्मसं-
...ना करितात. परंतु एकदां धर्मसंस्थापना झाल्यावर धर्मजागृति कर-
...ऱ्या धर्मप्रचारकांची जरूर असते. व धर्मप्रचारकांस राजाश्रयाची अत्य-
...न्त असते. कारण, प्रजेकडून धर्माचरण करविणें हा राजधर्मापैकींच
... आहे. ह्मटलें आहे कीं:--

कुलानि जातीः श्रेणीश्च गणान् जानपदानपि ॥
स्वधर्माच्चलितान् राजा विनीय स्थापयेत्पथि ॥ ३६१ ॥
(आचाराध्याय राजधर्म याज्ञवल्क्यस्मृति.)

...रून धर्मरक्षक राजेच होत. व धर्मप्रचारकांस मदत करणारेही
...त.

...रून परकीय धर्माचे जर राजे असतील, तर धर्माची ग्लानि हो-
...उशीर लागत नाहीं. ह्या आपल्या आर्यावर्तावर आज पुष्कळ वर्षें
...परकीय धर्माचेच राजे आहेत. त्यामुळें व कलिकालमहिम्यास अ-
... वीरशैवधर्मास ग्लानि आली आहे.

... सांप्रत आपण आपल्या दयाळू इंग्रज सरकारच्या राज्यछत्रा-
...पूर्ण शांततेचा अनुभव घेत आहोंत. व ज्यानें त्यानें आपापल्या
...नें वागावें अशी आपल्या दयाळू सरकारची उत्कट इच्छा आहे.
...नें प्रत्येकास आपापल्या धर्माची माहिती निर्भयपणानें व स्पष्ट
...आपापल्या धर्मबंधूंपुढें मांडितां येत आहे; ही मोठी समाधानकां-
... आहे.

...वेळीं ह्या सनातन वीरशैव धर्मास आलेली ग्लानि दूर करण्यास
...धर्मग्रंथांचें प्रकाशन व वीरशैवांच्या धर्माचरणाविषयीं धर्मोपदे-
...योजना हे दोन मार्ग प्रशस्त होत. त्यांपैकीं आह्मीं पहिल्या मा-
...र्गाचें अवलंबन यथाशक्ति करीत आहोंत. सिद्धीस नेणें परमेश्वराकडे

...वीरशैव धर्मग्रंथ कानडी, तेलंगी, आरवी, ताभिळ, द्राविड, वगैरे

लिपींत व संस्कृत भाषेंत आहेत. व त्या धर्मग्रंथांवर क्वचितच टीका आहेत. व ज्या थोड्या ग्रंथांवर टीका आहेत, त्या आरबी अथवा तेलंगी लिपींत लिहिलेल्या आहेत. या धर्मग्रंथांचें ज्ञान महाराष्ट्रांतील वीरशैव-लिंगिब्राह्मणांस व्हावें ह्मणून देवनगरी लिपींत महाराष्ट्र तात्पर्यासह ते छापण्याचा उपक्रम केला आहे.

सध्यां सुरू केलेल्या वीरशैव लिंगिब्राह्मण धर्मग्रंथमालेंत आजपर्यंत ३ ग्रंथ प्रकाशित झाले आहेत. व त्याच मालेंतील हा शंकरसंहिता-मध्यपठितवीरमाहेश्वरप्रकरण नामक चवथा ग्रंथ वाचकांस सादर करीत आहोंत. हा ग्रंथ स्कंदपुराणांतर्गत शंकरसंहितेंतील वीर-माहेश्वरप्रशंसा प्रकरणांतील, श्रीस्कंद ( षण्मुख ) आणि श्री शंकर यांच्या संवादरूपाचा आहे. ह्यांत पंच महामुद्रा, भस्म-रुद्राक्षमहिमा, भस्मरुद्राक्षधारणक्रम, प्रत्येक दिवसाचा आचरणक्रम, षट्स्थळांचें वर्णन, शिवाची अद्वैतभावानें पूजा केल्याचें फळ, वीरमाहेश्व-रांस ( जंगमांस ) दान केल्याचें फळ, विधियुक्त कर्म करण्याची अवश्य-कता, विधियुक्त कर्म केल्याचें फळ, व वीरशैवांचे नित्य नैमित्तिक आचार, वगैरे गोष्टींचें विस्तारानें वर्णन केलें आहे. करितां हा ग्रंथ प्रत्येक वीरशैव लिंगिब्राह्मणानें वाचून त्याप्रमाणें आचरण करण्याचा, व दुसऱ्यांस आच-रण करण्यास उपदेश करण्याचा प्रयत्न करावा, अशी त्यांस सविनय प्रार्थना आहे.

ह्या ग्रंथाच्या शेवटीं वीरशैव लिंगि ब्राह्मणांच्या धर्माचरणाबद्दल इतर ग्रंथांतील ( व्यासकृत शिवपुराण, सौरपुराण, स्कंदपुराण, भविष्यत्पुराण, वगैरे ) वेंचे देण्याचा विचार होता. परंतु हा ग्रंथ प्रकाशित करण्यास उशीर फार लागेल असें वाटल्यावरून ते वेंचे निराळ्या पुस्तकाच्या रूपानें प्रसिद्ध करण्याचा विचार केला आहे. सदरहू वेंच्यांत वीरशैव लिंगिब्राह्मणांच्या नित्यनैमित्तिक आचारांबद्दल बरेच ठिकाणीं आधार आ-हेत. यामुळें तें वेंच्यांचें पुस्तक फारच उपयोगी व महत्वाचें होईल, असा अजमास आहे.

ह्या ग्रंथाची महाराष्ट्रभाषेंतील टीका तयार करितांनां रा. रा. जगन्ना-

थ मोरेश्वर सामंत बी. ए. एल. एल. बी. ह्यांची आह्मांस फार मदत झाली, तिजबद्दल आह्मी त्यांचे फार आभारी आहोंत.

ह्या ग्रंथाची महाराष्ट्रभाषेंतील टीका रा. रा. त्र्यंबक भास्करशास्त्री खरे यांनीं केली आहे.

ग्राहकांच्या सोईसाठीं व किंमत कमी पडावी ह्मणून ह्या ग्रंथाच्या केवळ संस्कृत व केवळ महाराष्ट्रभाषेंत निरनिराळ्या प्रती काढिल्या आहेत. ज्यांस जशी इच्छा असेल तशा प्रती मागवून घ्याव्यात.

ह्या ग्रंथाची देवनगरी लिपींत महाराष्ट्र तात्पर्यासह ही प्रथमच आवृत्ति आहे. यामुळें ह्या प्रतींत वरींच दोषस्थलें राहिलीं असतील. तरी वाचकवृंदांनीं कृपा करून सदरहू दोष आह्मांस कळविल्यास आह्मी त्यांचे फार आभारी होऊं व पुढल्या आवृत्तींत ते दोष सुधारण्यास आह्मांस बरें पडेल.

प्रसिद्धिकर्ता.

---

# विषयानुक्रमणिका.

| अध्याय. | विषय. | पृष्ठसंख्या. |
|---|---|---|
| | भक्तीपासून ज्ञान व ज्ञानापासून मोक्ष | ७७ |
| | ह्मणून गुरूनें, दिलेल्या इष्ट लिंगाची तीन वेळ पूजा करावी | ७७ |
| | सत्य बोलण्याचें महत्व | ७८ |
| | राजा, स्त्री व भक्त यांजबरोबर वैर करूं नये याबद्दल | ७८ |
| | अतिथीला अतृप्त पाठवूं नये याबद्दल | ७९ |
| | शीत उष्ण, सुख दुःख, मान अवमान, यांचे ठिकाणीं समता ठेवण्याबद्दल | ७९ |
| | पुण्यवानाशीं प्रेमानें वागावें व पापी जनांची उपेक्षा करावी याबद्दल | ७९, ८० |
| | शिवक्षेत्रास यात्रेकरितां जाणाऱ्यांस मार्गावर अन्नपाणी द्यावें याबद्दल | ८० |
| | वेदमार्गरत व लिंगधारी अशांच्या कुळांतील भार्या करावी याबद्दल | ८१ |
| | परस्त्रीकडे वाईट नजरेनें पाहणें हें सर्व पापांत महापातक याबद्दल. | ८१ |
| | कर्माचें महत्व | ८२ |
| | स्वजातिधर्माप्रमाणें कर्म केल्याचें फळ | ८३ |
| | वर्णाश्रमधर्म आचरिल्यानें सम्यग्ज्ञान होतें याबद्दल | ८३ |
| | शंकरांशिवाय इतर देवांस दाखविलेला नैवेद्य भक्षण करूं नये याबद्दल | ८३ |
| | शंकरपूजेचे वेळीं चरपादोदकाचा नैवेद्य दाखवावा याबद्दल | ८४ |
| | अन्य जातींचे आचार आचरण करूं नयेत याबद्दल | ८४ |
| | धर्माची व्याख्या | ८४ |
| | ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचे धर्म | ८५ |
| | माहेश्वराची व्याख्या | ८५ |

## श्लोकांची शुद्धिपत्रिका.

| पृष्ठसंख्या. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ९ | ११ | सभूतिःसर्वदा ग्राह्यो | सा भूतिःसर्वदा ग्राह्या |
| १२ | ४ | न | नो |
| २५ | ५ | स्कन्दाम्बिका | स्कन्दोऽम्बिका |
| ३९ | ७ | सर्वलोकविवर्जितं | सर्वदोषविवर्जितं |
| ४० | ९ | भतयोनि | भूतयोनिं |
| ४२ | १२ | र्सवस्य | शर्वस्य |
| ५० | ३ | जगत्वये नास्ति | जगत्रयेऽन्यश्च |
| ५९ | ४ | पूजयेध्वं | पूजयध्वं |

# महाराष्ट्र टीकेची शुद्धिपतिका.

| पृष्ठसंख्या. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| २ | १९ | अभ्ने | अभ्रें. |
| १६ | १६ | त्याचीं | त्याची. |
| १६ | २९ | डावकिडे उजवकिडे | डावीकडे उजवीकडे. |
| २३ | १८ | प्रमानें | प्रेमानें. |
| २७ | १३ | पंचमहमुद्रा | पंचमहामुद्रा. |
| ३६ | २० | लोकानां अज्ञात | दोषांनीं वर्जित. |
| ४३ | २० | करणाचें | करणाराचें. |
| ४५ | २९ | तों | तो. |
| ४६ | १९ | स्वयंप्रभु | स्वयंप्रभ. |
| ४७ | २४ | २३ २४ | २३–२४. |
| ४९ | २६ | जा | जो. |
| ५० | २६ | प्राझ्या | माझ्या. |
| ५१ | २३ | जे वेदमार्गानिरत | जे. |
| ५२ | २० | षट्र | षट्. |
| ५६ | १५ | देणारे | देणारें. |
| ५६ | १६ | तू | तूं. |
| ५६ | २२ | राहिलें | राहिले. |
| ५६ | २४ | करून ८३ परम | करून (८३) परम. |
| ५६ | २७ | ) ८५ ) | ( ८५ ) |
| ५६ | २७ | निलकंठ | नीलकंठ. |
| ८० | २५ | अर्ध | अर्धे. |
| ८३ | २७ | यांनीं | यानें. |
| ८७ | १७ | चुकातिल | चुकतील. |

## छापत असलेले ग्रंथ.

१. **वीरशैवसंस्कार**— यांत गर्भाधानापासून और्ध्वदैहिकापर्यंत सर्व संस्कार कसे कसे करावे याची माहिती महाराष्ट्र तात्पर्यासह दिली आहे. २. **पादोदकविचार**–सशास्त्र रीतीनें पादोदक करण्याचा विचार या पुस्तकांत लिहिला आहे. गुरुपादोदक, क्रियापादोदक, गुरुपादतीर्थ ( वस्तु ) इत्यादि दशविध पादोदकांचें वर्णनही दिलें आहे. ३ **पारमेश्वरागम. ४. सुप्रभेदागम. ५. उपयुक्त वेंचे. ६. संक्षिप्त विवाहविधि. व्यासकृत भविष्यत्पुराण-उत्तरभाग(प्रभु लिंगलीला.)**

## विनंति.

अठ्ठावीस शैवागम शैवश्रुति व इतर शैव धर्मग्रंथांपैकीं कोणत्याही पूर्ण अगर अपूर्ण हस्तलिखित प्रति कोणाजवळ असल्यास, त्यांनीं त्या आह्मांकडे अगर रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांचे कडे पाठवून देण्याची मेहेरबानगी करावी. ह्मणजे धर्मग्रंथ छापण्याचे कामीं त्यांचा चांगला उपयोग करितां येईल. काम संपतांच त्यांची मूळ प्रत परत करूं व दोन छापील प्रतीहीं देऊं. आपली परत मिळेल किंवा नाहीं ही शंका मनांत आल्यास त्यांनीं आपली प्रत परत मिळण्याविषयीं इच्छेप्रमाणें खात्री पटवून घेऊन मग प्रत आमचे कडे पाठविण्याचें करावें.

प्रसिद्धिकर्ता.

---

श्रीगणेशाय नमः

॥ शंकरसंहितायां वीरमाहेश्वरप्रशंसा प्रारभ्यते. ॥

ऋषयः । भगवञ्छ्रोतुमिच्छामो वीरमाहेश्वरक्रमम् ॥ त्वमस्माकं महाभाग वक्तुमर्हसि सत्तम ॥ १ ॥

॥ सूत उवाच ॥

वक्ष्ये युष्माकमद्याहं शृणुत श्रद्धयान्विताः ॥ महेश्वरमुखोद्गीतं वीरमाहेश्वरक्रमम् ॥ २ ॥ पुरा कैलासशिखरे नानामणिगणावृते ॥ विद्याधरगणाकीर्णे देवगंधर्वसेविते ॥ ३ ॥ शकुन्तसंघसंघुष्टे प्रमथव्रजशोभिते ॥ अप्सरोगणसंबाधे सर्वाश्चर्यमनोहरे ॥ ४ ॥ हेमप्राकारसंयुक्तं रत्नवप्रविराजितम् ॥ पीयूषपरिखाक्रान्तनवद्वारविभूषितम् ॥ ५ ॥ पुरमस्ति महारम्यं रत्नतोरणमण्डितम् ॥ उपकण्ठसनाथोपवनमालाविराजितम् ॥ ६ ॥ वापीतटाकसंबाध पर्यन्तं गोपुरान्वितम् ॥ प्रासादमालासंलीढव्योममण्डलमुत्तमम् ॥ ७

---

अर्थ-सनकादिक ऋषि विचारतात, भो सूत, महाभाग वीर माहेश्वर (जंगम) यांचा आचार कसा आहे तें ऐकण्याची आमची इच्छा आहे, तरी ती आमची इच्छा तृप्त करण्यास आपणच समर्थ आहांत. १ सूत सांगतात, भक्तिनिष्ठ ऋषिहो, महेश्वरांनीं स्वतां सांगितलेला वीर माहेश्वरांचा (जंगमांचा) आचार, मी आज तुह्मांस सांगतों. तो तुह्मी भक्तिपूर्वक श्रवण करा. (२) कैलास नांवाचा एक पर्वत आहे. तेथें रत्नें व माणकें विपुल आहेत. त्या कैलास पर्वतावर प्रमथगण, विद्याधर, गंधर्व, अप्सरा, देव नेहमीं वास करितात, (३) व तो शकुन्त पक्ष्यांच्या समुदायानें अगदीं गजबजून गेलेला असतो. सर्व प्रकारच्या आश्चर्यकारक व मनोहर वस्तुही तेथें पुष्कळ आहेत. (४) अशा त्या कैलासपर्वताच्या उंच शिखरावर एक सुंदर नगर आहे. ह्या नगराची तटबंदी सोन्याची केलेली आहे, तटाला रत्नखचित बुरूज बांधलेले आहेत, व भोंवतीं अमृताची (पाण्याचा) परिखा (खंदक) केलेली आहे. (५) ह्या नगरास मोठमोठ्या नऊ वेशी आहेत, आकाश मंडळाशीं स्पर्धा करणारे, उंच उंच गोपुरांनीं मनोहर केलेले राजवाडे अगण्य आहेत, (७) येथें वापी कूप तळीं पुष्कळ आहेत. ह्या नगराच्या आसमंताद्भागीं मोठमोठ्या सुंदर बागा लावलेल्या आहेत (६) वसुंधरा

नानारत्नौघखचितं कर्णपत्रमिवावनेः ॥ पुण्यकृद्भिरवाप्यं तदप्राप्यं पापकर्मभिः ॥ ८ ॥ तत्रास्ति मंदिरं रम्यं चित्रभित्तिसमन्वितम् ॥ नानारत्नौघखचितं सहस्रस्थूणसंमितम् ॥ ९ ॥ तत्र सिंहासने शुद्धे सहस्रारविराजिते ॥ मृदुतूलाभिरचिततल्पास्तरणशोभिते ॥ १० ॥ शातकुम्भमये दिव्ये सूक्ष्मवस्त्रोत्तरच्छदे॥ परितःकीर्णमंदारपुष्पमालाविराजिते ॥ ११ ॥ समासीनं महादेवं योगिध्यानैकगोचरम् ॥ गिरिजाश्रितवामांकं स्वात्मानंदाम्बुधिस्थितम्॥ १२ ॥ सुरसीमंतिनीहस्तपर्यस्तासितचामरम् ॥ वामभागस्थविष्ण्वंसविन्यस्तकरपल्लवम् ॥ १३ ॥ कृतांजलिपुटेनाब्जजनुषा श्रुतिगोचरैः ॥स्तूयमानगुणव्रातं स्तवैः सर्वेश्वरेश्वरम् ॥ १४ ॥ नंदिना वेत्रहस्तेन शंकराहितदृष्टिना ॥ शिक्षितानेकचपलगणदर्शनलालसम्॥ १५ ॥ स्वयं स्वमेवध्यायन्तं शिवभक्त-

---

देवीचें कर्णभूषणच (बहिरव) असें हें स्थान पुण्यवान् लोकांसच केवळ प्राप्त होतें, व पापी लोकांस अगदीं तें दुर्मिळ आहे.(८)ह्या नगरांत नाना रत्नांनीं सुशोभित केलेलें व पाच माणीक वगैरे रत्नमय भिंतींचें एक सुंदर मंदिर आहे. ( ९ ) सहस्रपत्रकमलाप्रमाणें स्वच्छ व मऊ अशा कापसाच्या गाद्या गिरद्या ठेऊन सुशोभित केलेलें एक सिंहासन त्या मंदिरांत ठेवलें आहे. (१०)गाद्यागिरद्यांवर पातळ अभ्रे घातलेले आहेत. या सिंहासनासभोंवतीं दिव्य सुवर्णकलश ठेवलेले आहेत. व सभोंवार मंदारसुमनांच्या माला पसरिल्या आहेत. (११) अशा या सिंहासनावर योगिलोकांस ध्यान करण्यास सुलभ असे श्रीशंकर बसले आहेत. त्यांनीं वाम अंकावर श्री भवानीला धारण केलें आहे, व आपण स्वात्मानंदीं लीन झाले आहेत. ( १२ ) डाव्या बाजूस असलेल्या श्री विष्णूच्या स्कंधावर आपला हात ठेवला आहे. शुभ्र चवऱ्या वारण्याकरितां त्यांच्या(श्रीशंकरांच्या) सभोंवार देवांगना उभ्या (१३)आहेत. आणि इकडे करद्वय जोडून ब्रह्मदेव त्यांची गुणानुवादरूपस्तुति मोठमोठ्यानें करीत आहेत. ( १४ ) अनेक चंचल शिवगणांना प्रतिबंध करण्याकरितां हातांत वेत्रयष्टि घेऊन श्रीशंकरांकडे दृष्टि लावून नंदी उभे आहेत व चंचल शिवगणांना पाहण्याकरितां श्रीशंकर उत्सुक झालेले आहेत. ( १५ ) अशा वेळीं स्वतां स्वतांचें

हिते रतम् ॥ज्ञानशास्त्रं मुनींद्राणां व्याकुर्वंतंविमुक्तिदम् ॥ १६ ॥ भक्त्या प्रणम्य देवेशं पप्रच्छ शिखिवाहनः ॥ सर्वलोकोपकारार्थं भगवन्तं त्रिलोचनम् ॥ १७ ॥

॥ स्कन्द उवाच ॥

भगवञ्छ्रोतुमिच्छामि सर्वप्राणिहितं परम् ॥ केचिल्लिंगार्चनं पीठे प्रशस्तं तु प्रचक्षते ॥ १८ ॥ केचिच्छिवागमाभिज्ञाः प्राणलिंगार्चनापराः॥ लिंगे प्राणं समादाय करपीठे शिवार्चनम् ॥ १९ ॥ प्रशंसन्त्युत्तमं देव ब्रूहि किं मुख्यमेतयोः ॥ संशयं मे महान्तं तच्छेत्तु मर्हसि शंकर ॥ २० ॥

॥ शंकरः ॥

साधु पृष्टं त्वया वत्स वक्ष्याम्येतदशेषतः ॥वेदागमपुराणेषु सारं गोप्यं मनोहरम्॥२१॥भक्तिः स्थिरीकृता यस्मिन्म्लेच्छेऽपि द्विजसत्तम॥स

---

ध्यान करीत असून जे नेहमीं आपल्या भक्तांचें हित करण्यांत रत असतात व सर्व मुनिजनांस ज्ञानशास्त्र सांगत असतात (१६)अशा श्रीशंकरांना कार्तिकस्वामी सप्रेम नमस्कार करून सर्व लोकोपकारार्थ विचारते झाले. ( १७ ) श्रीस्कन्द ह्मणतात. कांहीं लोक पीठावर लिंग ठेवून त्याची पूजा करावी हेंच प्रशस्त मानतात (१८) आणि शिवागम जाणणारे कांहीं प्राज्ञ लोक लिंगाचे ठायीं प्राण ठेवून हस्तपीठावर लिंग ठेवून प्राणलिंगार्चना करावी ( १९ ) हेंच श्रेष्ठ मानतात तेव्हां हे देवाधिदेव ह्या दोहोंपैकीं उत्तम पूजा कोणती ह्याबद्दल मला संशय प्राप्त झाला आहे ( २० ) तरी तो संशय नाहींसा करण्यास आपणच समर्थ आहांत. याप्रमाणें सर्व प्राण्यांचे हिताकरितां श्रीस्कंदानीं प्रश्न केला तेव्हां श्रीशंकर ह्मणतात. हे वत्सा तूं फार उत्तम प्रश्न केलास, वेद आगम पुराण इतिहास यांतील सारभूत असें मनोहर गोप्य मी तुला सर्व सांगतों. ( २१ ) हे द्विजश्रेष्ठ, गुह, ह्याचे योगानें म्लेंच्छांचे मनांत सुद्धां मजविषयीं दृढ भक्ति उत्पन्न होते.

मे प्रियश्चतुर्वेदी न प्रियो भक्तिवर्जितः ॥२२॥सा भक्तिर्द्विविधा ज्ञेया बाह्याभ्यन्तरभेदतः ॥ बाह्या स्थूलान्तरा सूक्ष्मा वीरमाहेश्वरादृता ॥ २३ ॥ सिंहासने शुद्धदेशे सुरम्ये रत्नचित्रिते ॥ शिवलिंगस्य पूजा या सा बाह्या भक्ति रुच्यते ॥ २४ ॥ लिंगे प्राणं समादाय प्राणे लिंगं तु शांभवम् ॥ सशरीरं मनःकृत्वा न किंचिच्चिन्तयेद्यदि ॥ २५ ॥ साऽभ्यन्तरा भक्तिरिति प्रोच्यते शिवयोगिभिः ॥ सा यस्मिन्वर्तते तस्य जीवनं भ्रष्टबीजवत् ॥ २६ ॥ प्रारब्धकर्मभोगान्तमेव संसारदर्शनम् ॥ जीवन्मुक्तः स विज्ञेयो वीरमाहेश्वरःपुमान् ॥ २७ ॥ तस्य वक्ष्यामि हे वत्स शिवलिं-

---

आतां एखादा ब्राह्मण ऋग्, यजु, साम, अथर्वणादि वेदपठण केलेला असूनही मद्भक्तिपरायण नसेल तर तो मला प्रिय होत नाहीं, परंतु जर तो मद्भक्तिपरायण असेल तरच तो मला प्रिय होतो. ( २२ ) वत्सा. ( मुला ) वर सांगितलेली भक्ति बाह्यभक्ति व अंतर्भक्ति अशा दोन प्रकारची आहे. बाह्यभक्तीस स्थूलभक्ति ह्मणतात. व अंतर्भक्तीस सूक्ष्मभक्ति ह्मणतात. ह्या सूक्ष्मभक्तीचा वीरमाहेश्वरांनीं ( जंगमांनीं ) फारच आदर केलेला आहे. अर्थात् वीरमाहेश्वर ( जंगम ) शिवलिंगाचे ठायीं हीच भक्ति ठेवतात. ( २३ ) पवित्र ठिकाणीं रत्नखचित व सुंदर अशा सिंहासनावर शिवलिंग ठेवून शिवलिंगाची जी पूजा करितात तीस बाह्यभक्ति ह्मणतात. ( २४ ) व लिंगाचे ठायीं प्राण ठेवून व प्राणाचे ठायीं श्री शंकराचें लिंग ( आहे अशी भावना धरून ) धारण करून मन एकाग्र करून ( इतर विषयांचा विचार न करितां प्राणरूप लिंगाचे ठायीं मन ठेवून ) प्राणलिंगाव्यतिरिक्त ( शिवाय ) दुसरा कसलाही विचार न केला तर साध्य होणाऱ्या भक्तीस ( २५ ) शिवयोगी अभ्यंतर भक्ति असें ह्मणतात. व ही भक्ति ज्याचे ठायीं बाणलेली आहे त्याच्या पुनर्जन्माचें बीज जळून गेल्यासारखें होतें.( त्यास पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं. ) ( २६ ) त्याचप्रमाणें त्याला संसार केवळ पूर्वजन्माचीं कर्में भोगण्यापर्यंत असतो. अशा त्या वीरमाहेश्वरास ( जंगमास ) जीवन्मुक्तच समजावें. ( २७ ) अशा जीवन्मुक्त वीरमाहेश्वराच्या ( जंगमाच्या )

गार्चनक्रमम् ॥ संसारदुःखरोगस्य भेषजं मुक्तिसाधनम् ॥ २८ ॥
॥ वृ. ॥ नित्यानित्यविचारवानिह परत्रापेक्षितार्थारतिः शांत्या-
द्यंगसमन्वितः सुचरितो मोक्षार्थितौत्सुक्यवान् ॥ सत्यानंदपरप्र-
काशपरिपूर्णात्मावबोधान्वितं कृत्याकृत्यविवेकिनं गुरुवरं प्रेयात्सरो
भक्तिमान् ॥ २९ ॥ नत्वा भक्तिपुरस्सरं गुरुवरं विज्ञापयेत्पा-
र्श्वतः स्थित्वा जन्मशतागताद्भवभयाद्भीतोऽस्मि मां पाहि भो ॥ये-
नायं भवपादपः सुखफलः शोषं समूलं प्रयात्यारात्कर्मबलेन तत्क-
थय मे मोक्षप्रदं सद्गुरो ॥ ३० ॥ इत्युक्तो गुरुरादरेण कृपया
शिष्यं समीपस्थितं स्पृष्ट्वा पाणितलेन साधुगदितं भीतोऽस्मि वत्स

---

शिवलिंग पूजेचा विधि ( क्रम ) हे वत्सा तुजला मी सांगतों. हा क्रम संसाररूपी रोगाचें एक औषधच आहे व मोक्षदायकही आहे. ( २८ ) प्रथमतः मनुष्यानें प्रेमयुक्त होऊन नित्य, आणि अनित्य यांचा विचार करणें, इहँ परँलोकचे सुखास अप्रिय मानणें, शमदमादिषट्कसंपन्न होणें, सद्वर्तन ठेवणें, व मोक्षाची इच्छा धरणें, हीं चार साधनें अंगीं बाणवून स्वात्मानंदीं लीन असलेल्या व कँर्म अकँर्म जाणणाऱ्या गुरूला प्रेमभावानें शरण जावें. ( २९ ) अशा गुरुश्रेष्ठांस भक्तिपुरःसर नमस्कार करून बाजूस उभें राहून हे गुरुश्रेष्ठ सहस्र जन्मांत प्राप्त झालेल्या संसार भीतीनें मीं भयभीत झालों आहे. माझें संरक्षण करा. ( मला पुनर्जन्म येणार नाहीं असें करा ) हे मोक्षप्रद गुरो मला असें मोक्षदायक कर्म सांगा कीं तें केल्यानें क्षणभंगुर विषयसुख देणारा हा संसार क्षणांत नाश पावेल. व मी संसारयातनेपासून मुक्त होईन. (३०) याप्रमाणें मोठ्या सन्मानानें शिष्यानें गुरूस उद्देशून भाषण केल्यावर जवळच उभा

---

१ ब्रम्ह, २ जगत्, ३ पृथ्वि, ४ स्वर्ग, ५ शम, [ मनबुद्धिचित्त अहंकारादि अंतारिंद्रियांचा निग्रह ], दम [ पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें या बाह्येंद्रियांचा निग्रह] तितिक्षा [ परब्रम्हवस्तूवर दृढ निश्चय ठेवणें ], उपरति [ योगापासून प्राप्त होणाऱ्या दृढ निश्चयानें बाह्य प्रपंचाचा लय करणें ], समाधान श्रद्धा [ गुरु वेदांत वाक्यांवर विश्वास ], ६ वेद आगम पुराणांत करावीं अशीं सांगितलेलीं कर्में, ७ व " न करावीं " अशीं सांगितलेलीं अकर्में.

त्वया ॥ संसारार्णवतारके पराशिवे लिंगस्वरूपेऽमले प्राणं जीवकलाधरं तव निधास्ये त्वं तदास्याः परम् ॥ ३१ ॥ इत्युक्त्वा पूर्णकलशं तण्डुलस्योपरि स्थितम् ॥ अभिमंत्र्य सतारेण श्रीमत्पंचाक्षरेण च ॥ ३२ ॥ स्वयं च प्राङ्मुखो भूत्वा गोमयेनोपलेपिते ॥ मंडले स्थापितं शिष्यमुत्तराभिमुखं गुरुः ॥ ३३ ॥ अभिषेकं पुनः कुर्यात्कलशस्योदकेन सः ॥ शिष्यदेहे ततः शक्तिपातं कुर्यात्स्वविद्यया ॥ ३४ ॥ पीठस्थे शिवलिंगे तु शिष्यप्राणं निधाय च ॥ लिंगं संस्थाप्य तत्प्राणे प्राणलिंगं भवेत्ततः ॥ ३५ ॥ दत्वा शिष्याय तल्लिंगं श्रद्धाभक्तियुताय सः ॥ पूजय प्राणलिंगं त्वं यावज्जीवं प्रतिज्ञया ॥ ३६ ॥ पुनर्भवो न ते वत्स विद्यते

---

राहिलेल्या शिष्याला गुरूनें हस्तस्पर्श करून हे वत्सा तूं मला फार उत्तम प्रश्न केलास तो ऐकून मी फार संतुष्ट झालों. हे वत्सा ह्या संसार सागरांतून तरून जाण्यास सर्वोत्तम व निर्मल अशा शिवलिंगाचेठायीं तुझी प्राणज्योति जेव्हां मी स्थापन करीन तेव्हां तूं ही शिवस्वरूप होऊन जाशील. ( ३१ ) असें सांगून तांदुळांवर पाण्यानें भरून ठेवलेल्या तांब्यांतील पाण्याचें ॐकारपूर्वक पंचाक्षरी मंत्रानें अभिमंत्रण करावें. (३२) आणि नंतर आपण पूर्वाभिमुख होऊन व शिष्यास गाईचे शेणानें सारवून तयार केलेल्या जाग्यावर मण्डलाकार रांगोळी घातलेली असेल तेथें उत्तराभिमुख बसवावें. ३३. नंतर त्याचे मस्तकावर कलशांतील उदकानें अभिषेक करावा. व पंचाक्षरी मंत्रानें त्याचे देहांत शक्तिपात करावा. ह्मणजे पंचाक्षरी मंत्राचें तेजोरूप ध्यान करून तें तेज शिष्याचे शरीरांत प्रविष्ट करावें. ( पंचाक्षरी मंत्राचा उपदेश करावा) (३४.) पीठावर असलेल्या शिवलिंगाचे ठायीं शिष्याचे प्राण प्रविष्ट करावे, व हें शिवलिंग शिष्याचे प्राणांचे ठायीं स्थापन केलें असतां तें प्राणलिंग होतें. ( ३५ ) असें प्राणलिंग श्रद्धाभक्तियुक्त शिष्याला देऊन " यावज्जीव ह्या प्राणलिंगाची नियमानें पूजा कर " असा त्यास उपदेश करावा. (३६) व हें पूजन तूं कधींही सोडूं नको, सदासर्वकाळ पूजन कर, व

मा त्यजानिशम् ॥ इत्युक्त्वाभिमुखं शिष्यमानीय कृपया पुनः ॥ ३७ ॥ वीरमाहेश्वरं धर्मं क्रमादुपदिशेद्गुरुः ॥ वत्स लिंगार्चनं नित्यं त्रिकालं कुरु भक्तितः ॥ ३८ ॥ पूजाद्रव्याणि संशोध्य शुचिस्तद्गतमानसः ॥ हस्तसिंहासने लिङ्गमप्रमादेन धारय ॥ ३९ ॥ प्रमादात्पतिते लिङ्गे सहप्राणान् परित्यज ॥ कुरुष्व वत्सोपचारान् षोडशस्नानपूर्वकान् ॥ बाह्यानथाभ्यंतरांश्च समाहितमनाः सदा ॥ ४० ॥ स्नानं समत्वसलिलेन हि पूर्णभाववस्त्रं त्रिशक्तिगुणसंयुतयज्ञसूत्रम् ॥ विद्यासुगंधमिह भूतदयाक्षतांश्च शब्दादिपुष्पचयमर्पय नित्यमंग ॥ ४१ ॥ प्रज्ञामनोहंकृतिचित्तधूपं श्रोत्रादिपञ्चेन्द्रियदीपमंग ॥ तद्वासना-

---

असें करशील तर हे वत्सा, तुला पुनर्जन्म मुळींच प्राप्त होणार नाहीं. याप्रमाणें गुरूनें शिष्याला सांगितल्यावर त्याला आपल्या समोर प्रसन्न मुद्रेनें बोलावून(३७)क्रमाक्रमानें वीरमाहेश्वराच्या धर्मोचा उपदेश करावा.तो असा, हे वत्सा, दररोज प्रातःकाल मध्यान्हकाल व सायंकाल अशी त्रिकाल लिंगपूजा करावी. ( ३८ ) शुचिर्भूत होऊन लिंगाचे ठायीं आपलें मन एकाग्र करावें व नंतर शिवपूजेच्या साहित्याची अभिमंत्रित जलानें शुद्धि करावी. नंतर तळहातावर शिवलिंग काळजीपूर्वक धारण करावें. ( ३९ ) शिवलिंग चुकूनही हातावरून खालीं पडलें तरी प्राणपरित्याग करावा. शिवलिंगाचे ठायीं एकाग्र मन ठेवून त्या शिवलिंगास स्नानादि बाह्योपचार व मानसपूजादि अंतरोपचार असे सोळा उपचार समर्पण करावेत. ( ४० ) व त्या शिष्यास अंतरोपचारही सांगावे. ते असें. हे शिष्या, सर्व भूतांचे, (प्राण्यांचे व इतर सर्व पदार्थांचे ठायीं) समदृष्टि,हेंच कोणी एक जल, अशा जलानें शिवलिंगास स्नान घालावें. पूर्णनिष्ठारूप वस्त्र त्यास समर्पण करावें. इच्छा,क्रिया,ज्ञान,अशा तीन शक्तींचें यज्ञोपवीत ( शिवदोरा ) त्यास समर्पण करावा. विद्या हाच सुगंध, भूतदया ह्याच अक्षता, शब्दादि विषय हींच पुष्पें ( ४१ ) मन, बुद्धि, चित्त, अहंकार, हाच कोणी एक धूप, व श्रोत्र,नेत्र, घ्राण, जिव्हा,अशीं पञ्चेंद्रियें हाच कोणी एक दीप, वासनारूप तेल, सुखदुःखविवर्जित आत्मा, हाच कोणी एक

तैलयुतं च देहि जीवोपहारं सुखदुःखबाह्यम् ॥ ४२ ॥ गुणत्रयाख्यताम्बूलं प्राणार्पणनमस्कृतिम् ॥ शान्तिपुष्पांजलिं देहि चैकभावविसर्जनम् ॥ ४३ ॥ एवमाभ्यन्तरद्रव्यसम्भृतं शिवपूजनम् ॥ कृत्वा निधेहि सततं लिङ्गं वस्त्रेण वेष्टितम् ॥ ४४ ॥ मस्तके कंधरे कक्षे वक्षस्यथ करस्थले ॥ नाभेरधस्तात् सततं प्रमादान्नैव धारय ॥ ४५ ॥ इत्यादिष्टोऽथ गुरुणा शिष्यः श्रद्धासमन्वितः ॥ देहं दारान् धनं प्राणान् सर्वं तस्मै निवेदयेत् ॥ ४६ ॥ यस्य देवे यथा भक्तिः शिवभक्ते तथा गुरौ ॥ तस्य पाणितले मुक्तिः स्थिता हस्तस्थबिल्ववत् ॥ ४७ ॥ अथाश्रमी प्राणलिंगसंबंधी भस्मगुण्टिकाम् ॥ कंथां कमंडलुं भिक्षापात्रं दण्डं च धारयेत् ॥ ४८ ॥ एताः पञ्च महामुद्रा यस्मिन्यस्मिन्भवन्ति हि ॥ तं तं शरणमभ्येत्य सर्वभावेन पूजयेत् ॥ ४९ ॥ पञ्चमुद्रान्वितो धर्मो यस्मिन् वत्स प्रवर्तते ॥ स वन्द्यः सर्वदा

---

नैवेद्य, ( ४२ ) सत्वरजतम हाच त्रिगुणात्मक विडा, पंचप्राणांचें अर्पण, हाच नमस्कार, हीं त्या हातावरील शिवलिंगास समर्पण करावींत. शान्तिरूप पुष्पांजळी, व एकभाव, हेंच विसर्जन लिंगांस समर्पण करावें. ( ४३ ) याप्रमाणें मानसपूजाद्रव्यांनीं शिवलिंगाची पूजा करून त्या लिंगास नेहमीं वस्त्रांत गुंडाळून ठेव वें. ( ४४ ) हें लिंग मस्तकावर, गळ्यांत, खांकेंत, वक्षस्थळावर किंवा हातावर धारण करावें. चुकून सुद्धां कधींही बेंबीच्या खालीं धारण करूं नये. ( ४५ ) याप्रमाणें गुरूंनीं उपदेश केल्यावर भक्तियुक्त होत्साता शिष्यानें गुरूचे सेवेकरितां प्राण धन स्त्री पुत्र वगैरे सर्व समर्पण करावेत ( ४६ ) महेश्वराचे ठायीं जशी भक्ति असतें तशीच भक्ति शिवभक्ताचे ठायीं व गुरूचे ठायीं असेल तर हातांतील बिल्वफळाप्रमाणें त्याला मोक्ष अगदीं सुलभ आहे. ( ४७ ) प्राणलिंग धारण करणाऱ्या चतुर्थाश्रमी जंगमानें भस्म कंथा ( छाटी ) कमंडलु भिक्षापात्र ( कटोरा ) दंड अशा पंच महामुद्रा धारण कराव्यात (४८) ज्याचे ठायीं ह्या पंचमहामुद्रा वास करितात त्याला प्रेमपूर्वक शरण जाऊन त्याची सर्व भावानें पूजा करावी. ( ४९ ) हे वत्सा

पूज्यः प्राणलिंगसमन्वितैः ॥ ५० ॥ त्रिपुण्ड्रधारणं कुर्याद्भस्मना सजलेन च ॥ अग्निहोत्रसमुत्थेन विरजानलजेन वा ॥ ५१ ॥ सर्वांगोध्दूलनं कुर्यात्सद्योजातादिमन्त्रतः ॥ अग्निरित्यादिभिर्वापि षड्भिराथर्वणोदितैः ॥ ५२ ॥ विचारयेत्सदाज्ञानसाधनान्यखिलानि च ॥ पुराणागमवेदेषु प्राणलिंगसमन्वितः ॥ ५३ ॥ भक्तिः श्रद्धा तितिक्षाऽभिरतिर्दान्तिः शमो दया ॥रुद्राक्षधारणं भस्म ज्ञानाङ्गानि प्रचक्षते ॥ ५४ ॥ तेषां मुख्यतमं भस्मरुद्राक्षाणां च धारणम् ॥ यो धत्ते भस्मरुद्राक्षधारणं स भवेच्छिवः ॥ ५५ ॥ वर्णी वा तापसो वाऽपि शूद्रो वा यदि भूतिदः ॥ सभूतिः सर्वदा ग्राह्यो नोचेद्द्रोही ममैव सः ॥ ५६ ॥ यस्य धीर्विपरीता स्याद्भस्मरुद्राक्षधारणे ॥ द्वेषो वा जायते वत्स

---

हा पंचमहामुद्रायुक्त धर्म ज्याचे ठायीं वास करितो त्याची प्राणलिंग धारण करणाऱ्या जनांनीं नेहमीं पूजा करावी व त्यास नमन करावें. (५०) शिवाग्निहोत्रसंबंधी अगर विरज नांवाच्या गवतापासून उत्पन्न झालेल्या अग्नींतील ह्मणजे दावाग्नींतील ( वणव्यांतील ) भस्म घेऊन त्यांत जल घालून त्या जलमिश्रित भस्माचा आडवा त्रिपुण्ड्र( तीन रेघा ) कपाळावर करावा. (५१) सद्योजातादि मंत्र ह्मणून सर्व अंगावर भस्मोध्दूलन करावें (भस्म लावावें)किंवा अथर्वण वेदांतील "अग्निरिति"इत्यादि सहामंत्रांनीं भस्मावर जलप्रोक्षण करून तें भस्म लावावें. (५२) प्राणलिंग धारण करणाऱ्या मनुष्यानें पुराण आगम वेद इत्यादिकांत ज्ञानसाधनें काय काय आहेत याचा निरंतर विचार करावा.(५३) भक्ति, श्रध्दा, शांति, प्रीति, दम, शम, दया, रुद्राक्षधारण आणि भस्मधारण हीं ज्ञानाङ्गें समजलीं जातात. (५४) त्यांपैकीं भस्मधारण आणि रुद्राक्षधारण हीं मुख्य अंगें समजलीं जातात. व जो हीं दोनही धारण करील तो शिवच होईल (५५) सन्यासी, तपस्वी किंवा शूद्र यांपैकीं कोणीही जरी भस्म दिलें तरी तें ग्रहण करावें. आणि जर तें ग्रहण केलें नाहीं तर तो माझा द्रोही आहे असें समजावें. (५६) हे वत्सा भस्म आणि रुद्राक्षधारण यांचे ठिकाणीं ज्याची अश्रद्धा

तं विंद्याज्जारसंभवम्॥ ५७ ॥ पुराकृतमहापापवागुरावशवर्तिनाम्॥ नराणां पशुभूतानामयं धर्मो न रोचते ॥ ५८ ॥ देवतानामहं श्रेष्ठो मंत्राणां च षडक्षरी ॥ वर्णानां ब्राह्मणो यद्वद्धर्माणां भस्म-धारणम् ॥ ५९ ॥ विशेषतः प्राणलिंगसंबंधी भस्म धारयेत् ॥ रुद्राक्षमालामनिशं श्रद्धाभक्तिसमन्वितः ॥ ६० ॥ मस्तके कर्णयोः कंठे बाव्होर्मध्ये प्रकोष्ठके ॥ रुद्राक्षाणि यथाशक्ति धारयेदुपवीतके ॥ ६१ ॥ वदेत्सत्यं हितं पथ्यं प्रियं धर्मसमन्वितम्॥ वंचनं शिवभक्तेषु न कुर्वीत कदाचन ॥ ६२ ॥ पंचमुद्रान्वितं प्राणलिंगसंबंधिनं नरः॥पूजयेदादरेणैव यदीच्छेत्परमां गतिम्॥६३॥ पूजिते यत्र मद्भक्ते वीरमाहेश्वरे जने ॥ तत्राहं पूजितस्तस्मै दास्यामीष्टं षडानन ॥ ६४ ॥ यत्र माहेश्वरः कुर्याच्छिवलिंगार्चनं सकृत् ॥ वसन्ति तत्र तीर्थानि सर्वाणि सततं गुह ॥ ६५ ॥

---

उत्पन्न होईल किंवा विपरीत बुद्धि उत्पन्न होईल किंवा भस्म रुद्राक्ष यांचा जो द्वेष करील तो जारापासून उत्पन्न झाला आहे असें समजावें (५७) हा धर्म, पूर्व जन्मांत केलेल्या महापातकरूपी जाळ्यांत सांपडल्यामुळें केवळ पशु बनलेल्या मनुष्यांना च फक्त आवडत नाहीं.(५८) देवतांत जसा मी वरिष्ठ, वर्णांत जसा ब्राह्मण वरिष्ठ, मंत्रांत जसा शिवषडक्षरी मंत्र श्रेष्ठ, त्याप्रमाणें धर्मांत भस्मधारणधर्म वरिष्ठ आहे. (५९) विशेषेंकरून प्राणलिंग धारण करणाऱ्या मनुष्यानें भस्म व रुद्राक्षमाला श्रद्धाभक्तियुक्त होऊन धारण कराव्यात.(६०) हे रुद्राक्ष मस्तकांत, कानांत, गळ्यांत, दंडांत, मणगटांत, व यज्ञोपवीतांत, (शिवदोऱ्याला) यथाशक्ति धारण करावेत( ६१ )सत्य, हितकर, पथ्य, प्रिय व धर्मानुकूल भाषण करावें. शिवभक्तांना कधींही फसवूं नये.(६२) व सद्गतीची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें पंचमुद्रायुक्त प्राणलिंग धारण करणाऱ्या मनुष्याची आदरानें पूजा करावी(६३) याप्रमाणें मद्भक्त जे वीरमाहेश्वर ( जंगम ) यांची पूजा केली असतां माझीच पूजा केल्याचें फळ येतें व हे षडानना त्याचे सर्व मनोरथ मी पूर्ण करितों. (६४) हे गुहा कोणत्याही ठिकाणीं माहेश्वर जनांनीं (जंगमांनीं )

वीरमाहेश्वरं मां च विभिन्नं प्रवदन्ति ये ॥ ते मूढा एव मनुजा नात्र कार्या विचारणा ॥ ६६ ॥ वहिष्ठाः सर्वदा सर्वे तन्नंदी गणनायकः ॥ महात्मा प्राणलिंगैक्यः स एवाहं न संशयः ॥६७॥ यस्य गेहं समुद्दिश्य याति माहेश्वरो जनः ॥ क्रीडंति तस्य पितरो यास्यामः परमां गतिम् ॥ ६८ ॥ लिंगार्चनं यस्य गृहे शिवैक्यः कुर्वीत वै तस्य गृहं पवित्रं ॥ माता कृतार्था सफलं च जन्म धन्यः पिता पुण्यतमोऽन्ववायः ॥ ६९ ॥ अतः सुखार्थी शिवलिंगपूजकं समर्चयेन्नित्यमतंद्रितः सुधीः ॥ समस्तसंसार निवृत्तये सदा जलान्नवस्त्राभरणासनादिभिः॥ ७० ॥ वृ ॥वत्सैते गणनायकाः क्षितितलं गत्वा विमुक्तामयाः संभूताः सकलासु जातिषु पुनर्लिंगार्चनातत्पराः ॥ संस्थाप्योत्तरवीरशैवपदवीं लोके हितार्थं नृणां मुद्राः पंच वहंत एव विचरन्त्यन्ते समेष्यान्ति मा-

---

एक वेळ जरी शिवपूजा केली तरी त्या ठिकाणीं सर्व तीर्थें वास कारितात (६५) वीरमाहेश्वर ( जंगम ) आणि मी असे दोघे भिन्न आहोंत असें जे ह्मणतात ते मूर्ख आहेत. असें समजावें यांत विचार करण्याची मुळींच जरूर नाहीं. (६६) ते सर्व वहिष्कृत आहेत. गणाधीश महात्मा-नंदी ह्यानें प्राणलिंगाशीं ऐक्य केलें आहे ह्मणून तो व मी हे दोघेही एकच आहोंत, यांत कांहीं संशय नाहीं. (६७)अमक्याचे घरीं जावयाचें अशा उद्देशानें जेव्हां वीरमाहेश्वर लोक एखाद्याचे घरीं जावयास निघतात तेव्हां त्या मनुष्याचे पितर “ आह्मी आतां सद्गतीस जाऊं ” असें ह्मणून आनंदित होतात (६८) शिवलिंगाशीं ऐक्य भाव ठेवणारा जंगम ज्याच्या घरीं एकदांच लिंगपूजा करील त्याचें घर पवित्र होईल. त्याची जननी कृतकृत्य होईल. त्याचा जन्म सफळ होईल. व त्याचा वंश पवित्र होईल. (६९) ह्मणून आत्मसुखाची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें सकल संसार तापा-पासून मुक्त होण्यास निरलसपणानें शिवलिंगपूजकाची मनःपूर्वक पूजा करावी.व त्यास अन्नवस्त्र, अलंकार, आसन वगैरे समर्पण करावे. (७०) हे वत्सा षडानना हे गणनायक, पृथ्वीतलावर कोणत्याही कुळांत जन्मले तरी त्यांस

म् ॥ ७१ ॥ इति परमरहस्यं वत्स वेदांतसारं सकलसुरमुनींद्रै राहृतं भक्तिमद्भिः ॥ कथितमखिलदुःखध्वंसकं तुभ्यमेतत्त्वमपि कथय धर्मं प्राणलिंगैक्यभाजे ॥ ७२ ॥ इतीरितं शम्भुमुखारविंदा दाकर्ण्य तं प्राणशिवैक्यधर्मं ॥ स्कन्दो भवद्भक्तिसुधांबुराशौ मग्नो मुदा बाष्पपरीतनेत्रः ॥ ७३ ॥ लब्ध्वा संज्ञां महायोगी भक्त्या परवशो गुहः ॥ कृतार्थोऽस्मि कृतार्थोऽस्मीत्युक्त्वा शंभुं ननाम सः ॥ ७४ ॥

॥ सूत उवाच ॥

यूयं भाग्यवतां श्रेष्ठाः सर्वधर्मोत्तमोत्तमम् ॥ स्थापयध्वमिमं धर्मं वीरशैवं मुनीश्वराः ॥ ७५ ॥

॥ इति स्कान्दे शंकरसंहितायामुपरिभागे वीरमाहेश्वरप्रशंसानामैकाशीतितमोऽध्यायः ॥

---

कोणत्याही प्रकारची रोगपीडा होणार नाहीं. ते पुन्हां शिवलिंग पूजातत्पर होत्साते सर्व जनांच्या हिताकरितां या पृथ्वीवर वीरशैव धर्म स्थापन करितील आणि पंचमहामुद्रा धारण करून शेवटीं माझ्या पदाला प्राप्त होतील. (७१) हे वत्सा हें सर्व वेदांतसार आणि वेदांतरहस्य आहे. भक्तिमान् सर्व मुनिजनांनीं ह्याचा फार आदर केला आहे. सर्व दुःखनिवारक असें हें रहस्य तुजला कथन केलें आहे. करितां हें धर्मरहस्य प्राणलिंग धारण करणाऱ्यास कथन कर. ( ७२ ) याप्रमाणें श्रीशंभुमुखांतून प्राणशिवैक्य धर्म षडाननानें श्रवण केला. तेव्हां तो आनंदाश्रुभरित होऊन भक्तिरूप अमृतसमुद्रांत मग्न होऊन गेला. (७३) भक्तिसंपन्न तो महायोगी षडानन सावध झाला आणि मी कृतार्थ झालों असा द्विवार उच्चार करून त्यानें श्रीशंकराला नमस्कार केला. ( ७४ ) सूत सांगतात हे शौनकादि ऋषिहो तुम्ही महाभाग्यवान् आहांत. तुम्हीं हा वीरशैव धर्म पृथ्वीवर स्थापन करा. ( ७५ )

याप्रमाणें स्कन्द पुराणांतील शंकर संहितेंतील वरच्या भागांतला वीरमाहेश्वर ( जंगम ) यांची प्रशंसा वर्णन केलेला ८१ वा अध्याय समाप्त.

॥ श्रीशिवाय नमः ॥

॥ ऋषय ऊचुः ॥

कथितो भवता लिंगधारणक्रम उत्तमः ॥ पूजाविधिमिदानीं न दिनाचारान्वितं वद ॥ १ ॥

॥ सूत उवाच ॥

वक्ष्ये लोकोपकाराय लिंगपूजाविधिं द्विजाः ॥ यथा शिवेन कथितं स्कन्दायाऽमिततेजसे ॥ २ ॥

॥ स्कन्द उवाच ॥

दिनाचारयुतं देव लिंगार्चनविधिं मम ॥ वक्तुमर्हसि देवेश कृपया भक्तवत्सल ॥ ३ ॥

॥ श्रीशंकर उवाच ॥

वदामि संग्रहेणाहं पृच्छतस्तव षण्मुख ॥ संसारदुःखपाशघ्नं वत्स मोक्षैकसाधनं ॥ ४ ॥ब्राह्मे मुहूर्ते उत्थाय चिन्तयेच्छंकरं शुचिः ॥

---

ऋषि विचारतात कीं; महाभाग सूत ऋषिहो, शिवलिंग कसें धारण करावें याची रीति आपण सांगितली, आतां आह्मांस प्रत्येक दिवशीं कोणते कोणते व कसे आचार करावे, हें सांगा व श्रीशिवपूजा कशी करावी हेंही आह्मांस कथन करा. ( १ ) सूत सांगतात, हे शौनकादि ऋषिहो, महा तेजस्वी स्कन्दाला पूर्वी श्रीशंकरांनीं जो लिंगपूजेचा क्रम सांगितला आहे तोच मी आज तुह्मांस सांगणार आहें. ( २ ) श्रीस्कन्द श्रीशंकरांस ह्मणतात, भो तात, देवाधिदेव, भक्तकृपाघन, मला आपण आज दररोजचा आचार व लिंगपूजेचा विधि सांगण्यास समर्थ आहांत. ( ३ ) श्री शंकर ह्मणतात, हे षडानना, संसारदुःखनाशक आणि मोक्षप्रद असें हें लिंगपूजेचें साधन संक्षेपानें तुला कथन करितों. ( ४ ) पहांटेस ( २ ॥ ) अडीच घटका रात्र राहिल्यावर उठून शौचमुखमार्जन करून श्री शंकराचें ध्यान करावें. नंतर भवानी देवीचें ध्यान करावें, आज कोणकोणतें कर्तव्य करावयाचें, दोषवर्जित असें द्रव्य कसें

उमां धर्मं धनं दोषवर्जितं दिनकर्म च ॥ ५ ॥ धनाद्धर्मप्रवृत्तिःस्या न्नराणां धर्मकारिणां ॥ धर्मात्प्रसीदति शिवश्चिन्तयेत्तद्धनागमम् ॥ ६ ततो गृहाद्विनिर्गत्य बहिर्गच्छेदतन्द्रितः ॥ वाग्यतः पृथिवीभाग मिषुविक्षेपमात्रकम् ॥ ७ ॥ तत्रास्तीर्य तृणैर्भूमिं मलमूत्रं समुत्सृजेत् ॥ निष्ठीवेद्विसृजेद्वाचं वस्त्रप्रावृतमस्तकः ॥ ८ ॥ प्रक्षालयेद्गुदं शिश्नं मृद्भिरभ्युध्दृतैर्जलैः ॥ गंधलेपनिवृत्त्यर्थं कुर्याच्छौचमतन्द्रितः ॥ ९ ॥ यावन्मात्रमनःशुद्धिस्तावच्छौचं समाचरेत् ॥ आचम्य विधिवद्वत्स कृत्वा मंत्रेण मार्जनम् ॥ १० ॥ श्रीमत्पंचाक्षरेणैव गायत्र्या शैवया ततः ॥ स्नायाद्विशुद्धभावेन नरः संकल्पपूर्वकं ॥ ११ ॥ नद्यां तटाके वाप्यां वा गिरिप्रस्रवणे ऱ्हदे ॥ उध्दृतैरुदकैः कूपे दक्षः स्नानं

---

संपादन करावें, धर्म कोणता आचरण करावा, ह्या गोष्टींचेंही चिंतन करावें. ( ५ ) धर्माप्रमाणें आचरण करण्याची जी प्रवृत्ति असते तिचें कारण, धर्मानेंच संपादन केलेलें द्रव्य होय. अधर्मानें किंवा अनीतीनें जर द्रव्य संपादन केलें, तर त्या धनापासून धर्माचरणाकडे प्रवृत्ति सहसा होणार नाहीं. धर्माचरण केल्यानें शंकर प्रसन्न होतात ह्मणून नीतीनें धन संपादन करण्याकडे लक्ष द्यावें. ( ६ ) निरलस व मौनी ( न बोलतां ) झाल्या नंतर घरांतून बाहेर पडावें व धनुष्यांतून बाण सोडल्यावर तो जितका लांब जाईल तितक्या लांब जाऊन भूमीवर (७) गवत पसरून त्या गवतावर मलमूत्र विसर्जन करावें, त्यावेळीं बोलूं नये, थुंकावें व डोक्याला वस्त्र गुंडाळलेलें असावें.(८) तळ्यांतून किंवा नदींतून आणलेल्या पाण्यानें गुद आणि शिश्न माती लावून स्वच्छ धुवावें, व सर्व प्रकारचा दुर्गंध नाहींसा होण्या करितां (९) सर्व अवयव मनाला शुद्ध वाटेपर्यंत स्वच्छ धुवून टाकावेत व नंतर विधियुक्त आचमन करावें व शिवपंचाक्षरी मंत्रानें मार्जन करावें. ( १० ) नंतर देशकालादि संकल्प करून श्रीपंचाक्षरी मंत्रानें अगर शिवगायत्रीनें स्नानजलाचें अभिमंत्रण करून स्नान करावें. ( ११ ) नदींत तळ्यांत किंवा मोठ्या विहिरींत अथवा डोंगरांतील झऱ्यांवर अगर नदीच्या डोहांत स्नान करावें, व लहान विहिरींतून पाणी वर काढून शांत चित्तानें स्नान

समाहितः ॥ १२ ॥ अशक्तः कंठमात्रं वा कटिमात्रमथापिवा ॥ आचम्य चेलमहतं परिदध्यादथाचमेत् ॥ १३ ॥ प्रातःस्नानेऽप्यशक्तश्चेन्मध्यान्हे स्नानमाचरेत् ॥ ततश्शिवार्चनागारं शुद्धान्तःकरणः पुमान् ॥ १४ ॥ प्रविश्योपविशेत्तत्र स्वासने चोत्तराननः ॥ भस्मपात्रं विनिक्षिप्य जलपात्रं षडानन ॥ १५ ॥ ध्यायेच्छिवं जलाध्यक्षमोमापःसर्वमित्यपि ॥ शंकरं भस्मनि तथा श्रीमत्पञ्चाक्षरेण च ॥ १६ ॥ भस्मस्नानं ततःकुर्याज्जन्म कर्मनिवृत्तये ॥ अग्निरित्यादिभिर्मन्त्रैः सद्योजातादिमन्त्रतः॥ १७ सर्वाङ्गोध्दूलनं कुर्यादापादतलमस्तकम् ॥ मलनिर्मोचनं त्वेतज्जलस्नानं षडानन ॥ १८ ॥ भस्मस्नानं तु संसारतापविध्वंसकारकम् ॥ भक्षणात्सर्वपापानां भासनात्परमात्मनः ॥ १९ ॥ भस्मेति गीयते सद्भिर्वेदान्तेष्वागमेषु च ॥ योऽन्यथा मन्यते भस्म

---

करावें. ( १२ ) कोणी अशक्त असल्यास तर त्यानें गळ्यापर्यंत अगर कंबरेपर्यंत स्नान करावें, आचमन करावें, व वस्त्र परिधान करावें. (१३) प्रातःस्नान करण्याची शक्ति नसल्यास दुपारीं स्नान करावें, व पुन्हां आचमन करावें. नंतर मन प्रसन्न व शुद्ध करून, शंकरांच्या पूजागृहांत प्रवेश करावा. ( १४ ) व उत्तर दिशेस तोंड करून आपल्या आसनावर वसावें. नंतर हे षडानना भस्म आणून ठेवावें, नंतर जलपात्र आणावें. ( १५ ) " ॐ आपः " या मंत्रानें जलाध्यक्ष शंकरांचें ध्यान करावें, आणि श्रीमत्पंचाक्षरी मंत्रानें भस्मांतील शंकरविभूतीचें चिंतन करावें. ( १६ ) नंतर जन्म आणि कर्म यांचा परिहार होण्याकरितां भस्म स्नान करावें. " अग्निरिति " अथवा " सद्योजात " इत्यादि मंत्र ह्मणून ( १७ ) तें भस्म पायांपासून डोक्यापर्यंत सर्व अंगावर उधळावें. हे षडानना जलस्नान, मल किंवा दुर्गंध वगैरे नाहींसे होण्याकरितां होय. ( १८ ) आणि भस्मस्नान संसारताप नाशक होय. " हें भस्म सर्व पापांचें भक्षण करितें व भासन ह्मणजे परमात्म्याचें ज्ञान करून देतें (१९) यामुळें "भस्म" या शब्दाला अन्वर्थकत्व येतें, व याच करितां

स पापीयान्न संशयः ॥ २० ॥ योऽन्यथा मन्यते वत्स माताऽस्य व्यभिचारिणी ॥ मद्भक्ते भस्मरुद्राक्षधारणे मयि सर्वदा ॥ २१ ॥ महापापवतां द्वेषः स्वभावादेव जायते ॥ यस्येदं जन्म पाश्चात्यं तस्यानन्दोऽभिजायते ॥ २२ ॥ स्वभावान्मयि मद्भक्ते भस्मरुद्राक्षधारणे॥त्रिपुण्ड्रं धारयेत्पश्चाद्भस्मना सजलेन च॥ २३ ॥ श्रीमत्पञ्चाक्षरेणैव मन्त्रैरेभिः षडानन ॥ ललाटे-भगवान् ब्रह्मा हृदये हव्यवाहनः ॥ २४ नाभौ स्कन्दो गले पूषा बाहुमूले तु दक्षिणे ॥ रुद्रादित्यौ तथा सव्ये मणिबंधे शचीपतिः ॥ २५ ॥ वामनो वामभागे तु दक्षभागे प्रभञ्जनः ॥ वसवो मणिबन्धे तु पृष्ठदेशे हरःस्वयम् ॥ २६ ॥ शिरस्यात्मा महादेवः परमात्मेति हि श्रुतिः ॥ त्रिपुण्ड्रधारणं कृत्वा ततो रुद्राक्ष

---

सर्व विद्वज्जनांना ग्राह्य असा हा भस्माचा महिमा वेद, वेदान्त, आगम, पुराणें इत्यादि ग्रंथांत वर्णन केलेला आहे. वर लिहिल्याविरुद्ध बुद्धि भस्माचे ठायीं ज्या मनुष्यास होईल तो निःसंशय पापी यांत संदेह नाहीं. (२०) इतकेंच नाहीं पण ज्याची भस्माचे ठायीं अश्रद्धा उत्पन्न होईल त्याची माता निःसंशय व्यभिचारिणी होय. माझ्या भक्तांचे ठायीं, भस्मरुद्राक्ष आंगावर घालण्यांत, व माझे ठायीं,(२१) ज्याची अश्रद्धा उत्पन्न होईल तो महापापी समजावा. आणि ज्याचा हा जन्म शेवटला आहे व ज्यास पुनर्जन्म नाहीं अशा सज्जनाचीच माझे, ठायीं माझे भक्ताचे ठायीं, व भस्मरुद्राक्ष धारणाचे ठायीं, परम प्रीति उत्पन्न होते. भस्मोध्दूलन केल्यानंतर भस्माचा त्रिपुण्ड्र लावावा. ( २२-२३ ) श्रीपञ्चाक्षरी मंत्रानें अगर वर लिहिलेल्या सद्योजातादि मंत्रांनीं भस्मांत पाणी घालून इतर भागांवर तें लावावें. कपाळावर ब्रह्मदेव आहेत, हृदयांत अग्नि, (२४) नाभिकमलांत स्कन्द, गळ्यांत सूर्यदेव, व बाहुमूलाचे ठायीं, डावकिडे व उजवकिडे रुद्र, आणि आदित्य, आहेत. उजव्या मनगटावर इंद्र आहे (२५) व डाव्या मनगटावर अष्टवसु, शरीराच्या उजव्या बाजूस वायु, व डाव्या बाजूस वामन, आहे. पाठीकडल्याबाजूस शंकर, स्वतः वास्तव्य करितात.(२६) व मस्तकाचे ठायीं

धारणम् ॥ २७ ॥ कुर्यादुक्तप्रकारेण तत्तत्स्थाने समाहितः ॥ शिखायामेकरुद्राक्षं षट्त्रिंशदथ मस्तके ॥ २८ ॥ द्वात्रिंशद्धारयेत्कण्ठे बाव्होः षोडश षोडश ॥ कर्णयोः षट् प्रकोष्ठे च द्वादशद्वादशाऽनघ ॥ २९ ॥ धारयेदुपवीतं तदष्टोत्तरशतान्वितम् ॥ अक्षमालां च बिभ्रीयात्सप्तविंशतिसंयुताम् ॥ ३० ॥ एवं देहमलंकृत्य नरो रुद्राक्षमालया ॥ रुद्रनेत्राम्बुजातानि रुद्राक्षाणि नरोत्तमः ॥ ३१ ॥ यो धत्ते भस्म सततं स रुद्रो नात्र संशयः ॥ जलपुष्पाक्षतादीनि पूजाद्रव्याणि शोधयेत् ॥ ३२ ॥ शिवार्हाण्यतिरम्याणि पवित्राणि षडानन ॥ ततो रुद्रमयीं कुर्या-

---

परमात्मा महादेव आहे, असें श्रुतींत वर्णन केलें आहे. प्रथमतः त्रिपुंड्र धारण करावा, ह्मणजे भस्माच्या तीन तीन रेघा आंगठ्यापुढल्या तीन बोटांनीं, हृदयाला, नाभीला, खांद्याजवळ, गळ्याला, दंडाला, दोनही मनगटांना, दोनही कुशींत, पाठीला, आणि मस्तकाला लावाव्या. कपाळाला आंगठ्यानें उजवीकडून डावीकडे व मधलें बोट व अनामिका (चवथें बोट) यांनीं डावीकडून उजवीकडे अशा लोमविलोम तीन रेघा लावाव्या. याप्रमाणें त्रिपुंड्र धारण केल्यावर रुद्राक्ष घालावे. ( २७ ) ते धारण करण्याचा प्रकार खालीं लिहिल्याप्रमाणें समजावा. शेंडीला एक रुद्राक्ष, मस्तकावर छत्तीस, ( २८ ) गळ्यांत बत्तीस, आणि दोनही दंडांत सोळा सोळा, कानांत सहा, आणि मनगटांत बारा बारा, घालावे. ( २९ ) एकशें आठ रुद्राक्षांचें यज्ञोपवीत धारण करावें, व सत्तावीस रुद्राक्षांची, जपमाळा घ्यावी. (३०) याप्रमाणें मनुष्यानें रुद्राक्षमालांनीं आपलें शरीर सुशोभित करावें. हे षडानना, हे रुद्राक्ष शंकराच्या नेत्रांतील जलापासून उत्पन्न झाले आहेत. ( ३१ ) ह्मणून जो मनुष्य रुद्राक्षमालांनीं आपलें शरीर सुशोभित कारितो, व जो नेहमीं भस्म धारण कारितो, तो प्रत्यक्ष रुद्रच होय. नंतर रुद्रपूजेकारितां योग्य व पवित्र आणि रम्य अशीं जल, पुष्पें, अक्षता, गंध, नैवेद्य, फळ, तांबूल, वगैरे पूजाद्रव्यें अभिमंत्रित जलानें प्रोक्षण करून शुद्ध करून घ्यावींत. (३२) तीं पूजाद्रव्यें शंकरांना योग्य अशीं व पवित्र असावीं. नंतर

त्तनुं रुद्रार्चनापरः ॥ ३३ ॥ अरुद्रः पूजयेद्रुद्रं न पूजाफल-
भाग्भवेत् ॥ रुद्रोभूत्वा यजेद्रुद्रं नारुद्रो रुद्रमर्चयेत् ॥ ३४ ॥
प्राणलिङ्गाङ्गसंबंधी स रुद्रो नात्र संशयः ॥ शरीरे वत्स
करणान्यधितिष्ठन्ति देवताः ॥ ३५ ॥ आभ्यन्तराणि बाह्यानि
दर्शनाद्युपभोगतः ॥ अर्पितानि भवन्त्येव द्रव्याणि शिखि-
वाहन ॥ ३६ ॥ अर्पितान्यर्पयेद्यः स रौरवं नरकं व्रजेत् ॥
तद्दोषपरिहाराय शरीरं देवतामयम् ॥ ३७ ॥ भूतेन्द्रियादि-
संयुक्तं ध्यायेद्रुद्रात्मकं नरः ॥ ततः समाहितमनाः शंकरध्यान-
तत्परः ॥ ३८ ॥ पूर्वोक्तेन प्रकारेण कुर्याल्लिंगार्चनं नरः ॥
पाद्यार्घ्याचमनस्नानं पुनराचमनं गुह ॥ ३९ ॥ वस्त्रं यज्ञोप-
वीतं च मण्डनं गन्धमक्षताः ॥ पुष्पाणि शिवयोग्यानि पत्राणि
विविधानि च ॥ ४० ॥ धूपं दीपं घृतयुतमुपहारं षडानन ॥

---

रुद्राची पूजा करणाऱ्या मनुष्यानें आपलें अखिल शरीर रुद्रात्मक करावें. (३३) आणि रुद्ररूप आपण आहोंत, असें न स्मरतां जर कोणी रुद्राची पूजा करील तर रुद्रपूजेचें फल त्यास प्राप्त होणार नाहीं. (३४) ज्यानें प्राणलिंग धारण केलें आहे तोच रुद्र आहे. ह्या शरीरांतील इंद्रियांचे ठायीं देवता वास करितात.(३५) अंतरिंद्रियें आणि बाह्येंद्रियें यांचेठायीं असलेल्या देवता नाना उपभोग्य वस्तूंचे उपभोग नुसत्या दर्शनानें किंवा इतर साधनांनीं घेतात, यामुळें तीं पूजाद्रव्यें शंकरास अर्पण करण्याचे पूर्वींच वरील इंद्रियस्थित देवतांस समर्पण होतात. (३६) आणि एकदां अर्पण केलेलीं द्रव्यें जो पुनः समर्पण करितो तो रौरव नरकाला जातो. क-रितां अर्पण केलेले पदार्थ पुनः अर्पण करण्याचा दोष लागूं नये ह्मणून (३७) आपलें शरीर रुद्रमय आहे असा भाव धारण करावा, व नंतर पंचभूतें व दशेंद्रियें हीं रुद्राचींच उपांगें आहेत असें मानून व मन एकाग्र करून शंकराचे ध्यानांत निमग्न व्हावें (३८) व नंतर पूर्वी वर्णन केल्याप्रमाणें शंकराची पूजा करावी. प्रथमतः पाद्य, अर्घ्य, आचमन, स्नान, पुनः आचमन, (३९)नंतर वस्त्र, यज्ञोपवीत, अलंकार, गंध, अक्षता, व शंकरांना प्रिय असलेलीं फुलें, पत्रें वगैरे, (४०) धूप, घृतदीप, फराळ, नैवेद्य, तशींच उत्तम

भक्ष्यभोज्यान्नशाखादि प्रशस्तद्रव्यसंयुतम् ॥ ४१ ॥ दद्या-
च्छिवाय ताम्बूलं कर्पूराद्युपदंशकम् ॥ घृताक्तवर्तियुक्तानि
शालिपिष्टकृतानि च ॥ ४२ ॥ नीराजनानि रम्याणि दद्यादे-
काग्रमानसः ॥ श्रीमत्पञ्चाक्षरेणैव मन्त्रेण शिखिवाहन ॥ ४३ ॥
पुष्पाञ्जलिं तथा दद्याद्वेदमन्त्रैस्त्रिशूलिने ॥ लौकिकैर्वैदिकैस्तोत्रैः
शिवं स्तूयात्स्वशक्तितः ॥ ४४ ॥ नेक्षेत पूजावेलायां नरं
वत्स बहिष्कृतम् ॥ शिवद्रोहिणमाचारनिंदकं न हृदि स्मरेत्
॥ ४५ ॥ शिवे शैवागमे शैवे धर्मे शिवपरिग्रहे ॥ जङ्गमे प्रा-
णलिंगैक्ये शिवलिङ्गार्चने गुह ॥ ४६ ॥ शिवस्थानेषु सर्वेषु
वाराणस्यादिकेषु च ॥ विपरीता भवेद्बुद्धिर्यस्य स्यात्स बहिर्नरः
॥ ४७ ॥ दधीचिना गौतमेन ये शप्ता ब्राह्मणाधमाः ॥ क-
लाववतरिष्यन्ति निन्दकास्ते बहिर्नराः ॥ ४८ ब्रह्महत्यासु-

---

पक्वान्नें व शाका समर्पण कराव्यात. ( ४१ ) विडा, कापूर, आदिकरून मुखशुद्धीचे पदार्थ अर्पण करावेत. तसेंच तांदुळाच्या पिठाचे दिवे करून त्यांत तुपांत भिजविलेल्या वाती लावाव्यात.( ४२ )व हे षडानना, सुंदर अशा नीराजनांनीं देवास ओंवाळावें. नंतर पंचाक्षरी मंत्रानें व वैदिक मंत्रांनीं ( ४३ ) शंकरास पुष्पांजलि समर्पण करावी. व यथाशक्ति शंकराचीं वैदिक किंवा लौकिक भाषेंत केलेलीं स्तोत्रें ह्मणावीं. ( ४४ ) पूजेच्या वेळीं पतित, जातिभ्रष्ट मनुष्याचें दर्शन घेऊं नये. व शंकराचा द्वेष करणाऱ्या व शिवाचारांची निंदा करणाऱ्या मनुष्याचें मनांत सुद्धां स्मरण करूं नये. (४५) ज्या मनुष्याची बुद्धि शिवाचे ठायीं, शिवागमाचे ठायीं, शिवधर्मावर, शिवाचे भक्तावर, प्राणलिंगाचें ऐक्य ज्याचे मनांत पूर्ण बिंबलें आहे अशा जंगमाचे ठायीं, ( ४६ ) शिवपूजेवर, व वाराणस्यादि सर्व शिवक्षेत्रांचे ठायीं, विपरीत झाली; ह्मणजे ज्याची वर लिहिलेले ठायीं अश्रद्धा उत्पन्न झाली तो मनुष्य भ्रष्ट होय. ( ४७ ) पूर्वीं दधीचि ऋषींनीं व गौतम ऋषींनीं ज्या ब्राह्मणाधमांना शाप दिलेले आहेत तेच भ्रष्ट ब्राह्मण कलियुगांत उत्पन्न होतील व त्यांची बुद्धि नेहमीं शिवनिंदा करण्याकडे वाहील. ( ४८ ) पूर्वीं ज्यांनीं ब्रह्महत्या, सोन्याची चोरी, दारू

रापानस्वर्णस्तेयकृतः पुरा ॥ बहिर्नरा भविष्यन्ति कलावीश्वर-
निन्दकाः ॥ ४९ ॥ न तैश्च सह भाषेत न सहासीत चासने ॥
तेषां पङ्क्तौ न भुञ्जीत न तैः कुर्वीत बन्धुताम् ॥ ५० ॥
प्रमादादर्चनाकाले पश्येद्यदि बहिर्नरम् ॥ प्रायश्चित्तेन महता
शुद्धिमाप्नोति मानवः ॥ ५१ ॥ एतेषां दर्शने प्रायश्चित्तमष्टो-
त्तरं शतम् ॥ श्रीमत्पञ्चाक्षरं मन्त्रं जपेद्ध्यात्वा शिवं नरः
॥ ५२ ॥ स्पृष्ट्वा बहिर्नरं स्नात्वा सचेलं शिवनिन्दकम् ॥
दत्वा तु भस्मताम्बूलं मद्भक्तान्स तु भोजयेत् ॥ ५३ ॥ शङ्ख-
चक्राङ्किताङ्गं च वैष्णवं शिवदूषकम् ॥ पश्येद्यदि प्रमादा-
त्स कुर्यात्सूर्यावलोकनम् ॥ ५४ ॥ तिलकं चतुरश्रं वा दीपा-
श्वत्थदलाकृतीः ॥ ललाटे धारयेद्यस्तु न तं पश्येदनापदि॥ ५५॥
प्रमादात्पश्यति यदा तदा सूर्यं विलोकयेत् ॥ दूषकानर्चनाकाले
सर्वदा न विलोकयेत् ॥ ५६ ॥ एवमेकाग्रचित्तेन प्राणलिङ्गा-

---

पिणें, वगैरे पातकें केलीं आहेत तेच कलियुगांत ईश्वरनिंदक होऊन भ्रष्ट होतील. ( ४९ ) त्यांच्याबरोबर भाषण करूं नये. व त्यांस आपल्या आसनावर बसूं देऊं नये, त्यांच्या पंक्तीला बसून जेवूं नये, व त्यांसह-वर्तमान मित्रत्व करूं नये. (५०) चुकून शिवपूजेचे वेळीं पतित मनुष्याचीं दृष्टादृष्ट झाली तर मोठें प्रायश्चित्त घेतल्याशिवाय मनुष्य पावन होत नाहीं. (५१) यदा कदाचित् असल्या भ्रष्ट नरांचें दर्शन झालें तर श्री शंकराचें ध्यान करावें व पंचाक्षरी ( नमः शिवाय ) मंत्राचा (१०८)एकशें आठ जप करावा आणि ( ५२ ) शिवनिंदक पतित मनुष्याचा जर स्पर्श किंवा विटाळ झाला तर वस्त्रांसह स्नान करावें; व माझ्या भक्तांना भस्म, तांबूल देऊन त्यांस भोजन द्यावें. ( ५३ ) शंख चक्र वगैरे मुद्रा धारण करणाऱ्या शंकरनिंदक वैष्णवाचें जर चुकून दर्शन झालें तर सूर्याचें दर्शन घ्यावें. ( ५४ ) जो मस्तकावर चौकोनी, दिव्याचे ज्योतीच्या आकाराचा, पिंपळाच्या पानाच्या आकाराचा, तिलक लावतो, त्याचें चांगल्या वेळीं सुद्धां मुख पाहूं नये. ( ५५ ) आणि जर पाहिलें तर सूर्यदर्शन करावें व शिवपूजेचे वेळीं शिवनिंदकांकडे अवलोकन सुद्धां करूं नये. ( ५६ )

ङ्गसंगिना ॥ क्रियते येन मे पूजा तस्मै दास्याम्यभीप्सितम् ॥ ५७ ॥ सेवकान् पाचकांश्चोपकरणद्रव्यसाधकान् ॥ शिवभक्तांश्च कुर्वीत भस्मरुद्राक्षधारिणः ॥ ५८ ॥ एवं पूजाविधिं कृत्वा प्रातःकाले समाहितः ॥ ब्राह्मणान् शिवभक्तांश्च पूजयेद्भक्तिसंयुतः ॥ ५९ ॥ अप्यापदि दुरंतायां यावज्जीवमिदं व्रतम्॥ न त्यजेद्यःपुमान् वत्स स जीवन्मुक्त उच्यते ॥ ६० ॥ ब्रह्महत्यासहस्राणि भ्रूणहत्याशतानि च ॥ कुर्वन्नपि न लिप्येत प्राणलिङ्गार्चनापरः ॥ ६१ ॥ एवं लिङ्गार्चनं कृत्वा प्रातःकाले विशुद्धधीः ॥ वृत्त्यर्थमर्जयेदर्थं सर्वदोषविवर्जितम् ॥ अर्थात्पञ्चमहायज्ञाःप्रवर्तन्ते नृणामिह॥ ६२ ॥ वृ ॥ ततो गृहद्वारमुपेत्य मर्त्यः काङ्क्षीत गोदोहनमालमत्र ॥ देशान्तरादागतमन्नकामं लिङ्गार्चकं चातिथिमीश्वरस्य ॥ ६३ ॥ समागतं पुण्यबलात्तदा-

---

याप्रमाणें प्राणलिंग धारण करणाऱ्यानें एकाग्र मनानें माझी पूजा केली असतां त्याचे सर्व हेतु मी सफल करितों. ( ५७ ) स्वयंपाक करणारे, पूजेची तयारी करणारे, व इतर सेवक ठेवावयाचे ते, भस्म, रुद्राक्ष धारण करणारे व शिवभक्त असतील असेच ठेवावेत. ( ५८ ) याप्रमाणें प्रातःकाळीं लक्षपूर्वक व आचारयुक्त शिवलिंग पूजा करून शिवभक्तांची आणि ब्राह्मणांची प्रेमपुरःसर पूजा करावी.( ५९ ) घोर संकटकालीं व इतर वेळीं सदोदित हें व्रत करावें. आजन्मांत सोडूं नये. याप्रमाणें जो हें व्रत करितो त्याला जीवन्मुक्त ही संज्ञा प्राप्त होते.( ६० ) जो मनुष्य प्राणलिंगाची पूजा करितो त्याचे हातून न कळत हजारों ब्रह्महत्या किंवा शतशः भ्रूणहत्या ( गर्भहत्या, )घडल्या तरी त्यास त्या हत्यांचें पातक लागत नाहीं. (६१) शुद्ध अंतःकरणानें दररोज लिंगाची पूजा करावी. नंतर निर्वाहाकरितां सर्वदोषरहित असें द्रव्य संपादन करावें. कारण द्रव्याच्या योगानेंच पंचमहायज्ञ ( देव, ऋषि, पितृ, भूत, मनुष्ययज्ञ ) साध्य होतात. (६२) नंतर मनुष्यानें घराच्या पुढल्या दरवाज्याजवळ येऊन गाईची धार काढावयास जितका वेळ लागतो तितका वेळ उभें राहावें आणि अन्य देशाहून अन्नाकारितां आलेल्या अगर येणाऱ्या अतिथीची किंवा लिंगाची पूजा करणाऱ्याची

तिथिं समर्चयेदीश्वरचेतसस्ततः ॥ जलासनार्घ्यव्यवसेचनादिभि-
स्तथान्नपानैःप्रियवाग्भिरादरात् ॥६४॥ ततःकुलाचारसुशीलयुक्तं
शिवार्चनातत्परमन्यगोत्रम् ॥ समर्चयेत्तं पितृतोषणार्थं द्विजाढ्य-
मेकं विदितागमार्थम् ॥ ६५ ॥ ततः समाराधनतत्पराञ्जनान्
विभूतिरुद्राक्षविभूषिताङ्गिनः ॥ विशुद्धभावान् वरवीरशाम्भवान्
संपूजयेद्भक्तिपुरस्सरं नरः ॥ ६६ ॥ स्वयं भुञ्जीत तैस्सार्धं वाग्यतः
स्वस्थमानसः ॥ प्रशस्तमन्नपात्रे च शुद्धं ध्यात्वा शिवां शिवम्
॥ ६७ ॥ पथ्यं शिवार्पितं चान्नं भक्ष्यमूलफलान्वितं ॥ भुञ्जी-
याद्प्रमादेन द्वात्रिंशद्ग्राससंयुतम् ॥ ६८ ॥ भक्ष्यमूलफलादीनि
शिवायानर्पितानि तु ॥ भुञ्जीयाद्यः प्रमादेन छिन्द्याज्जिव्हां
स्वयं नरः ॥ ६९ ॥ विना माहेश्वरैरेको यस्तु भुङ्क्ते षडा-
नन ॥ स पापीयानघं भुङ्क्ते सःश्रीकण्ठापराधकृत् ॥ ७० ॥

---

वाट पाहात बसावें. ( ६३ ) आपल्या पुण्यप्रभावानें एकादा अतिथि आला तर त्याचे ठायीं ईश्वराचीच व्याप्ति आहे असें समजून त्याला पाणी व बसावयास आसन द्यावें, मग त्याचे पाय धुऊन त्यास अन्नोदक समर्पण करावें, व प्रेमपूर्वक शब्दांनीं त्याशीं संभाषण करावें. ( ६४ ) नंतर सदाचारसंपन्न व शिवपूजेंत तत्पर असा एकादा दुसरा वेदवेदार्थ जाणणारा द्विज बोलावून आपल्या पितरांच्या संतोषार्थ त्याची पूजा करावी. ( ६५ ) नंतर विभूतिरुद्राक्ष धारण करणारे व शंकर-पूजेंत निमग्न असलेले व सदाचरणयुक्त असलेले वीरशैव बोलावून त्यांची पूजा करावी. ( ६६ ) व त्यांना घेऊन शांत मनानें व मौन धारण करून व शिवभवानींचें ध्यान करून आपल्या भोजनाच्या विस्तृत ताटांत आपण स्वतः भोजन करावें. ( ६७ ) शंकरांना निवेदन केलेलें, पथ्यकर, व मूलफलांदिकांनीं समवेत असलेलें अन्न (३२) बत्तीस घांसच फक्त जेवावें. ( ६८ ) भक्ष्यपदार्थ, मुळें, फळें वगैरे, शिवाला न अर्पण केलीं असतां, जो भक्षण करितो, त्याची जिव्हा कापून टाकावी. ( ६९ ) जंगमाशिवाय एकटाच जो भोजन करितो तो पापी आहे, व शंकरांचा अपराधी आहे असें समजावें.(७०) ज्या सद्गृहस्थाचे घरीं प्राणशिवे-





॥ वृ ॥ माहेश्वरा यस्य गृहे न कुर्युर्लिङ्गार्चनं प्राणशिवैक्यभाजः ॥ भुञ्जीयुरन्नं नहि तस्य जन्म व्यर्थं पशूनामिव जीवितं तत् ॥ ७१ ॥ यस्यालये त्र्यंबकभक्तिभाजो वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः ॥ भुक्तिं प्रियाद्वत्स सकृद्द्विजेन्द्राः कुर्वन्ति जन्मार्थवदेव तस्य ॥ ७२ ॥ वीरमाहेश्वरो यस्य गेहे भुङ्क्ते षडानन ॥ पितरस्तस्य गच्छेयुस्तृप्तिं चानन्तवार्षिकीम् ॥ ७३ ॥ अतो माहेश्वरान् शुद्धान् भोजयित्वा विधानतः ॥ पश्चाद्भुञ्जीत सार्कं वा पुत्रबंधुजनैर्युतः ॥ ७४ ॥ ततो हस्ताङ्घ्रिवक्त्राणि प्रक्षाल्याचम्य शुद्धधीः ॥ वत्स राजवदासीत सुखमासनमास्थितः ॥७५॥ ॥ वृ ॥ पुराणवेदान्तशिवागमेषु विचारयेत्तत्त्वमनन्तरूपम् ॥ सदाशिवाख्यं विमलं चिदंशं परात्परं सत्यचिदात्मभूतम् ॥ ७६॥ ततः सायन्तने कालेऽप्येवमेवाचरेन्नरः ॥ दिने दिने महाभाग कुर्यादेवं समाहितः ॥ ७७ ॥ ॥ वृ ॥ एवं यस्तु शिवार्चनं प्र-

---

क्य ज्यांचे ठायीं पूर्ण बाणलें आहे असे जंगम लिंगपूजा करणार नाहींत व भोजन करणार नाहींत त्याचा जन्म पशूंच्या जन्माप्रमाणें निरर्थक आहे. ( ७१ ) त्र्यंबकाची भक्ति करणारे व वेदांतज्ञानसंपन्न असे द्विजजन जर एकदांच प्रमानें एकाद्याचे घरीं अन्न ग्रहण करितील तरीही त्याचा जन्म सफळ झाला असें समजावें. ( ७२ ) हे षडानना, ज्याचे घरीं जंगमलोक भोजन करितात त्याचे पितर अनन्त वर्षेंपर्यंत त्या भोजनानें तृप्त राहतात. ( ७३ ) ह्मणून शुद्धाचारसंपन्न माहेश्वर ( जंगम ) जनांना विधियुक्त भोजन घालावें व नंतर आपल्या पुत्रमित्रबंधुजनांसह भोजन करावें. ( ७४ ) नंतर हात, पाय, तोंड धुवावें व आचमन करून शुद्ध मनानें मऊ आसनावर राजासारखें बसावें. ( ७५ ) वेदान्त, शिवागम, पुराणें, वगैरे ठिकाणीं वर्णन केलेल्या अनंत तत्वाचा विचार करावा, व सच्चिदानंदरूप, शुद्ध, व परात्पर, शिवतत्वाचें ध्यान करावें.( ७६ ) याप्रमाणेंच संध्याकाळीं व प्रत्येक दिवशीं आचरण करावें. ( ७७ ) याप्रमाणें प्रत्येक दिवशीं भक्तियुक्त होऊन जो शिवपूजा करितो, आणि

तिदिनं कुर्वीत भक्त्या नरः सत्याचारसमन्वितः शिवकथा-पीयूषवर्षावृतः ॥ संसाराम्बुनिधिं तरङ्गतरणं तापत्रयग्राहिणम् दुष्पारं प्रतरेत् स गोष्पदमिव त्र्यक्षाङ्घ्रिभक्तिप्लवात् ॥७८ लिङ्गार्चनाविधिरयं कथितो मया ते संसारबन्धनविनाश-करः षडास्य ॥ ज्ञानप्रदः सकलवेदपुराणसारः शिष्टादृतः शिवकरो दिनकृत्ययुक्तः ॥ ७९ ॥ इदं पवित्रं पापघ्नं सर्ववेदेषु सम्मतम् ॥ सारात्साररतरं वत्स तव स्नेहान्मयोदितम् ॥ ८० ॥ सङ्ग्रहेणोदितो वत्स लिङ्गार्चनविधिस्तव ॥ एष मोक्षप्रदः सत्यः शेषोऽन्यो ग्रन्थविस्तरः ॥ ८१ ॥ ॥ वृ ॥ इदमखिलरहस्यं लिङ्गपूजाविधानं सुजनसुरमुनीन्द्रैरादृतं भक्तिमद्भिः ॥ भवभयपरिहारं वेदवेदान्तसारम् त्वमपि कथय सर्वं लिङ्ग-पूजारताय ॥ ८२ ॥

॥ सूत उवाच ॥

इत्युक्त्वा शङ्करस्तूष्णींबभूव मुनिसत्तमाः ॥ वक्तव्याभावमा-

---

सदाचारसंपन्न होऊन जो नेहमीं शिवकथारूप अमृताचें सेवन करितो, त्यास, शंकरभक्तिरूप नौकेच्या योगानें, अपार जो तापत्रयरूप नक्रांनीं युक्त असलेला संसारसमुद्र, तो गाईच्या पाउलांनीं पडलेल्या खाचेंतील पाण्याप्रमाणें तरून जाण्यास सुलभ होईल. ( ७८ ) हे षडानना, संसारबंधनाशकारक, ज्ञानकारक, व वेदपुराणांतील सारभूत, शुभप्रद व शिष्टांनीं आदरानें मानलेला असा हा लिंगपूजाविधि मीं तुला आज निवेदन केला.( ७९ ) सर्व सारांचें सार, पापविनाशक, पवित्र, असें हें पूजाविधान स्नेहानें मीं तुला कथन केलें आहे. ( ८० ) हा लिंगपूजाविधि तुला संक्षेपानें निवेदन केला आहे. हाच मोक्षप्रद व सत्य आहे. याविरहित इतर गोष्टी फक्त ग्रंथविस्तार होत. ( ८१ ) हें लिंगपूजाविधान सुजनांनीं व सुरमुनींनीं मोठ्या प्रेमानें आदरिलें आहे. हें सर्व वेदवेदांतसार आहे व संसारभयनिवारक आहे. हें त्वां लिंगपूजा करण्यांत तत्पर असलेल्या जनांसच कथन करावें. ( ८२ ) सूत ह्मणतात, याप्रमाणें श्रीशंकर बोलून पुढें बोलावयाचें कांहीं न राहिल्यामुळें पार्वतीच्या मुखाकडे दृष्टि ठेवून

लोक्य शिवास्यन्यस्तलोचनः ॥ ८३ ॥ ॥ वृ ॥ श्रुत्वाशम्भुमुखाम्बुजाच्छ्रुतिगतां लिङ्गार्चनापद्धतिम् नत्वा शंकरपादपद्मयुगलं ब्रह्मेन्द्रकृष्णार्चितम् ॥ त्यक्त्वा कर्मकलापमन्यविषयं स्कन्दाम्बिकाप्रेमभूरासीच्छंकरलिङ्गपूजनरतो लिङ्गाङ्गसंबंधवान् ॥ ८४ ॥ यूयं श्रद्धान्विता विप्राः प्राणलिङ्गाङ्गसंगिनः ॥ स्थापयध्वमिमं मार्गं भुक्तिमुक्तिफलप्रदम् ॥ ८५ ॥

इति स्कान्दे शंकरसंहितायामुपरिभागे लिङ्गार्चनविधिर्नाम द्व्यशीतितमोऽध्यायः ॥

---

उगीच बसले. ( ८३ ) याप्रमाणें शंकरांनीं सांगितलेली लिंगपूजेची पद्धति श्रवण करून ब्रह्मदेव, विष्णु, आदि देवतांनीं वंदन केलेल्या अशा श्रीशंकरांच्या पदकमलाला नमस्कार करून लिंगांगसंबंधयुक्त होत्साता षडानन लिंगपूजेंत निमग्न झाला. व इतर सर्व कर्मे सोडून देऊन तो पार्वतीकडे प्रेमयुक्त दृष्टीनें पाहूं लागला. ( ८४ ) प्राणलिंगधारण करणारे ऋषिहो, तुह्मी हा भोग व मोक्षदायक असा मार्ग मोठ्या प्रेमानें स्थापन करा. ( ८५ )

याप्रमाणें स्कन्दपुराणांतील शंकरसंहितेचा "लिंगपूजाविधि" नामक ( ८२ ) वा अध्याय समाप्त झाला.

॥ श्रीशिवाय नमः ॥

॥ ऋषय ऊचुः ॥

भगवन् सर्वधर्मज्ञ वीरमाहेश्वरो जनः ॥ ब्रूहि कां वृत्तिमाश्रित्य विचरेत् पृथिवीमिमाम् ॥ १ ॥

॥ सूत उवाच ॥

वक्ष्यामि संग्रहेणाहं युष्माकं मुनिसत्तमाः ॥ यत्क्रौंचदारणायाह नीलकंठोऽम्बिकापतिः ॥ २ ॥ कैलासशिखरे रम्ये समासीनं महेश्वरम् ॥ पप्रच्छ प्रणतोभूत्वा कृतांजलिपुटः पुरा ॥ ३ ॥

॥ स्कंद उवाच ॥

नीलकंठ विरूपाक्ष वीरमाहेश्वराश्रिताम् ॥ वृत्तिं कथय देवेश मोक्षमार्गैकसाधकाम् ॥ ४ ॥

॥ ईश्वर उवाच ॥

वक्ष्ये भाग्यवतां श्रेष्ठ सङ्ग्रहेण षडानन ॥ वीरमाहेश्वरस्यैतां वृत्तिं वेदागमोदिताम् ॥ ५ ॥ यदा लिंगाङ्गसम्बन्धी नरः स्याद्देशिका-

---

सनकादि ऋषि विचारतात, भो सर्वधर्मज्ञ, सूत, महाभाग, वीरमाहेश्वर ( जंगम ) जनांनीं कोणती वृत्ति स्वीकारून ह्या मर्त्यलोकीं वास करावा? ( १ ) सूत सांगतात, भो मुनिश्रेष्ठ, अंबिकापति श्रीशंकर ह्यांनीं कार्तिकस्वामींनां जो आचार विस्तारानें निवेदन केला आहे तोच तुह्मांस मी थोडक्यांत सांगतों. ( २ ) पूर्वी कैलास पर्वताच्या मनोहर शिखरावर श्रीशंकर बसले असतां त्यांस स्कंदांनीं ( षण्मुखांनीं ) नमस्कार करून हात जोडून प्रश्न केला. स्कन्द ह्मणतात—( ३ ) हे नीलकंठ, देवाधिदेव, मोक्षमार्ग प्राप्त करून घेण्याकरितां वीरमाहेश्वरांनीं ( जंगमांनीं ) कसें वर्तन ठेवावें हें कृपा करून मजला सांगा. ( ४ ) ईश्वर सांगतात—हे महाभाग षडानना, वेद, आगम, पुराण, इत्यादिकांत वर्णन केलेली वीरमाहेश्वरांची ( जंगमांची ) आचारपद्धति मी तुला तात्पर्यानें कथन करितों. ( ५ ) मनुष्य ज्या वेळीं देशिकाकडून लिंगधारण करून घेईल, त्यावेळीं

ज्ञया ॥ तदा पञ्चमहामुद्रा धारयेच्छुद्धमानसः ॥ ६ ॥ विभूति घुण्टिकां भिक्षापात्रं दण्डं कमण्डलुम् ॥ कंथां शीतापनोदार्थं शुद्धभावसमन्वितः ॥ ७ ॥ यतः कुतश्चिदानीय शास्त्राण्येव विचारयेत् ॥ शिवोदितानि लिंगांगसंबन्धार्थकृतानि च ॥ ८ ॥ कोऽहं मोक्षः कथं केन संसारं प्रतिपन्नवान् ॥ इत्यालोच्य धिया पक्वचित्तस्तत्वं विचारयेत् ॥ ९ ॥ किंस्वित्तत्त्वं शरीरं स्याद्भूतग्रामविनिर्मितम् ॥ कथमन्नसमुद्भूतमन्नाद्वृद्धिमुपेष्यते ॥ १० ॥ विनश्येत्तन्न तत्वं स्यान्नेन्द्रियाणि न धीर्मनः ॥ नाहंकृतिर्न चित्तं स्यान्न माया न च कर्म च ॥११॥ इति निश्चित्य मनसा यदुक्तं गुरुणा पुरा ॥कृत्वा लिंगांगसम्बन्धं तदेवं विमृशेत्सुधीः॥१२॥ लिंगं किमङ्गमिति किं सम्बन्धः कोऽयमेतयोः ॥ लिंगांग-

---

त्यानें शुद्ध अंतःकरणानें पंचमहमुद्रा धारण कराव्यात. (६) त्या पंचमहामुद्रा येणें प्रमाणें. भस्माची गोळी, भिक्षापात्र, काठी, कमंडलु, व शीतनिवारणार्थ कंथा (धाबळी), अशा पंचमहामुद्रा होत.( ७ ) ज्या ठिकाणीं सांपडतील त्या ठिकाणाहून, लिंग आणि अंग ह्यांचा संबंध दाखविणारीं श्रीशिवोक्त शास्त्रें संपादन करून त्यांचें मनन करावें. ( ८ ) त्याचप्रमाणें मी कोण आहें, मुक्ति कशी प्राप्त करून घेतां येईल, व ह्या संसारसमुद्रांत मी कसा पडलों, व मला ह्या संसारसागरांत कोणीं टाकलें, याचा विचार करून शुद्धमनानें तत्वाचें चिंतन करावें.( ९ )तत्व ह्मणजे काय, पंचभूतांपासून ह्मणजे पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, यांपासून शरीर कसें उत्पन्न झालें, अन्न कसें उत्पन्न होतें, व अन्नापासून शरीर वृद्धिंगत कसें होतें, याचाही विचार करावा. तसेंच (१०)ज्याचा नाश होतो तें तत्व नव्हे, ह्मणून इंद्रियें, बुद्धि, मन, चित्त, अहंकार, माया, कर्म, इत्यादि तत्वें नाहींत.(११) असा विचार करून व पूर्वी गुरूनीं सांगितल्याप्रमाणें निश्चयबुद्धीनें लिंग धारण करावें. व नेहमीं त्याचाच विचार करावा. (१२) लिंग ह्मणजे काय, अंग ह्मणजे काय, व लिंग आणि अंग ह्यांचा संबंध कसा करावा, ह्याचें व लिंग, अंग, संबंध, ह्या तीन पदांचें नेहमीं चिंतन करावें.

सम्बन्धपदान्येवमेव विचारयेत् ॥ १३ ॥ लिंगरूपो महादेवः सच्चिदानन्दलक्षणः ॥ अंगरूपो हि जीवात्मा भवभारनियन्त्रितः ॥ १४ ॥ तत्पदेनोच्यते सद्भिर्लिङ्गरूपः सदाशिवः ॥ त्वंपदेनांगरूपो हि जीवः संसारलक्षणः ॥ १५ ॥ त्वमर्थोऽग स्वरूपो यः सोहं शब्दार्थ एव हि ॥ त्वमहंपदलक्ष्यार्थश्चिद्रूपः परमेश्वरः ॥ १६ ॥ त्वमहंपदवाच्यार्थस्यैव देहादिवस्तुनः ॥ न तच्छब्दार्थतास्त्येव विरुद्धत्वात्सदैव हि ॥ १७ ॥ त्वमहंपदलक्ष्यार्थो जीवात्मा चांगरूपकः ॥ अशिवश्चेत्सदानन्दस्ततो नैव शिवो भवेत् ॥ १८ ॥ जगच्चराचरं यत्तत्सत्यं पूर्णं चिदात्मकम् ॥ शुद्धं तदंगरूपो हि तत्त्वमर्थो न संशयः ॥ १९ ॥ तत्त्वंपदार्थे लिंगांगरूपेऽन्योन्यविरुद्धकम् ॥ उपाधिकृतवाच्यार्थं त्यक्त्वा

---

( १३ ) सत्, चित्, आनंद, ह्या तीन पदांनीं, लक्षित असा लिंगरूपी महादेव आहे. आणि अंग ह्मणजे संसारपाशबद्ध जीवात्मा होय. ( १४ ) ज्ञाते लोक तत् या पदानें लिंग पद दाखवितात. ह्मणजे तत् या पदाला साधुलोक लिंगरूप सदाशिव ह्मणतात आणि त्वं पदानें अंगरूपी संसारी जीवात्म्याचा उल्लेख केलेला आहे. ( १५ ) अंगरूपात्मक जो जीव व ज्यास 'त्वं' ही संज्ञा आहे "तो मीच आहें." ( सोऽहं ) हा केवळ वाच्यार्थ झाला. ( त्वमहं ) या पदाचा जो लक्ष्यार्थ तो चिद्रूप परमेश्वर होय. ह्मणजे तूं, मी व तो या तीन पदांनीं लक्ष्य जी वस्तु तो चिद्रूप परमेश्वर आहे. ( १६ ) तूं मी या शब्दांच्या वाच्यार्थास ( शरीर, इंद्रिय, मन, बुद्धि, इत्यादि वस्तूंस ) सदोदितच्या परस्परविरुद्ध स्वभावामुळें तच्छब्दार्थता ( तत् शब्दानें दाखविलेला वस्तुपणा ) कधीही येणार नाहीं ( १७ ) त्वमहं या पदाचा लक्ष्य पदार्थ शिवच आहे तो जीव, लक्षणेनें जर शिवरूपी नसेल तर तो आनंदरूप शिव कधींच होणार नाही. ह्मणजे त्याला मोक्ष मुळींच मिळणार नाहीं. ( १८ ) स्थावर जंगम असें हें जगत् सत्तारूपी आहे, पूर्ण चिदात्मक आहे व शुद्ध आहे. आणि त्वंपदानें दाखविलेला अंग रूप जीव ही तोच आहे. यांत संशय नाहीं. ( १९ ) तत्पदार्थ व त्वंपदार्थ लिंग स्वरूपी व अंग स्वरूपी

सच्चित्सुखात्मकम् ॥ २० ॥ लक्ष्यार्थमविरुद्धं यच्छिवं तदिति या मतिः ॥ सा सम्बन्ध इति प्रोक्तो वेदान्तागमवेदिभिः ॥ २१॥ लिंगरूपो महादेवः पूर्णश्चैतन्यलक्षणः ॥ भाति यः सोऽङ्गरूपोहं जीवात्माऽस्मि न चाऽपरः ॥ २२ ॥ यो भामि चाङ्गरूपोऽहं जीवात्मा परमात्मनः ॥ सोयमात्मा महादेवो लिंग रूपः सदाशिवः ॥ २३ ॥ सोऽविद्योपाधिको भूत्वा भवत्यङ्गस्वरूपवान् ॥ लीनं गच्छति यस्मिन्सा माया दुर्घटकारिणी ॥२४॥ तल्लिङ्गमिति सन्मात्रं रूप्यते पारमार्थिकैः ॥ एतस्मात्कारणादेव लिंगरूपत्वमीशितुः ॥ २५ ॥ लिङ्गं गमकमित्याहुरपरे लिङ्गवित्तमाः ॥ गम्यते योगिभिर्धातोर्गमेर्ज्ञानार्थदर्शनात् ॥ २६ ॥ तथा निरूप्यते सद्भिर्लिङ्गं चिन्मात्ररूपतः ॥ एतस्मात् कारणाच्चापि प्रसिद्धं परमात्मनः ॥ २७ ॥ लिंगरूपत्वमीशस्य नीलकण्ठस्य शूलिनः ॥ अथ तूक्तप्रकारेण लिंगरूपो महेश्वरः ॥२८॥ इति वेदान्ततन्त्रेषु गीयते तत्ववित्तमैः ॥ अमितिब्रह्मसन्मात्रं

---

असून त्यांतील परस्पर विरोधी असा उपाधीनें केलेला वाच्यार्थ टाकून अविरोधी सच्चित्सुखात्मक लक्ष्यपदार्थ जो शिव,तीच वस्तु अशी जी बुद्धि,तिला वेदान्त आगम जाणणारे याणीं लिंगांगसंबंध असें ह्मटलें आहे. (२०,२१) जो पूर्ण चैतन्य लक्षण लिंगरूप महादेव स्वयं प्रकाशमान् आहे तोच मी अंगरूप जीवात्मा आहें. भिन्न नाहीं. ( २२ ) जो अंगरूप मी जीवात्मा परमात्म्यापासून प्रकाशतों तो मी आत्मा लिंगरूप महादेवच आहें.( २३ ) तो महादेव अविद्योपाधियुक्त होऊन जीवस्वरूपी होतो. अघटित घटना पटु माया ज्याठिकाणीं लीन ( नाहींशी ) होते त्यालाच केवळ सत्तास्वरूपी लिंग ह्मणतात. या कारणामुळेंच ईश्वराला लिंग रूपत्व आहे. ( २४,२५ )इतर शिवयोगी लोक लिंग ज्ञापक अथवा मोक्षदायक आहे असें मानतात.( २६ ) व गम हा धातु ज्ञानरूपी पदार्थ दाखविणारा असल्यानें योगी लोकांकडून जें जाणलें जातें तें लिंग होय.( २७ )या वर लिहिलेल्या प्रकारांनीं नीलकण्ठ ईशानाचें लिंगरूपत्व स्थापन होतें. ( २८ ) अं ह्मणजे ब्रह्म व त्याचे ठायीं ग ह्मणजे जाणारें त्याला अंग

गच्छतीति गमुच्यते ॥ २९ ॥ रूप्यतेऽङ्गमिति प्राज्ञैरङ्गतत्त्व-विचिन्तकैः ॥ तस्मादङ्गस्वरूपोऽसौ जीवः संसारवृत्ति-भाक् ॥ ३० ॥ संसारवृत्तिरहितो लिङ्गरूपोऽम्बिकापतिः ॥ लिङ्गाङ्गरूपयोर्योऽसौ संयोगः शिवजीवयोः ॥ ३१ ॥ एकस्व-रूपः सुदृढः सम्बन्ध इति स स्मृतः ॥ तत्पदेनोच्यते लिंगं त्वं पदेनाङ्गमीरितम् ॥ ३२ ॥ अनयोरैक्यभावोऽयं सम्बन्धोऽसिपदेन च ॥ इति वाक्यानुसंधानं भासते यस्य सन्ततम् ॥३३॥ गुरूपदेशाल्लिङ्गाङ्गसंबन्धीति स उच्यते ॥ एवं लिङ्गाङ्गस-म्बन्धभावना यस्य विद्यते ॥ ३४ ॥ स योगी स च सर्वज्ञः स जीवन्मुक्त उच्यते ॥ लिङ्गाङ्गपदवाच्यार्थं हित्वा सम्यग्धिया पुनः ॥ ३५ ॥ लक्ष्यार्थं लक्षयित्वाऽहं सोहमेवेति चिन्तयेत् ॥ लिङ्गाङ्गपदसम्भूतसम्यग्धीजन्ममात्रतः ॥ ३६ ॥ अविद्यास-हकार्येण नाभूदस्ति भविष्यति ॥ लिङ्गं शिवो भवान्यङ्गमनयोः

---

ह्मणतात ( २९ ) याप्रमाणें अंग असें रूप सिद्ध होतें. असें तत्वज्ञ लोकांचें मत आहे. ह्मणून संसार पाशबद्ध व संसार वेदना भोगणारा हा जीव अंगरूप आहे. व ( ३० ) संसार पाशमुक्त षड्भाव रहित असा शिव, लिंग रूपात्मक आहे. लिंग आणि अंगरूप शिव जीव या रूपांचा जो संयोग किंवा ऐक्यभाव त्यालाच संबंध असें ह्मणावें. ( ३१ ) हा संबंध एकरूप आणि दृढतर आहे. यांतील तत्पदानें लिंग ह्या पदाची परिस्फुटता करितात आणि अंग पदानें त्वंपदाचा बोध करितात.(३२) या दोघांचा संबंध असि पदानें होतो. याप्रमाणें“ तत्वमसि ” ह्या महावाक्याचा अर्थ ज्याचे ठायीं नेहमीं जागृत असतो. त्याला वर दर्शित केल्याप्रमाणें ( ३३ ) गुरूपदेश झाल्यानें “ लिंगांगसंबन्धी ” अशी संज्ञा प्राप्त होते. त्यालाच ( ३४ ) योगी, सर्वज्ञ, जीवन्मुक्त असेंही ह्मणतात. लिंग आणि अंग या पदांचा वाच्यार्थ सोडून देऊन “ सोहं ” मी तोच आहें अशा ( ३५ ) लक्ष्यार्थाकडे लक्ष्य द्यावें. लिंग आणि अंग या पदांपासून उत्पन्न होणारी जीव शिवैक्य सद्बुद्धि जन्मापासून असते. ( ३६ ) परंतु अविद्येच्या आवरणानें ती जीवशिवैक्य रूपबुद्धि नाहीं, नव्हती, होणार नाहीं,

सङ्गतिः परा ॥ ३७ ॥ आनन्दरूपिणी या सा सम्बन्ध इति कथ्यते ॥ अङ्गं शक्तिः शिवो लिङ्गं तयोर्भक्त्याऽवगम्यते ॥ ३८ ॥ इति विज्ञाननिष्पत्तिर्या सा सम्बन्ध उच्यते ॥ अङ्गं शक्तिरितिप्रोक्तं शक्तिमल्लिङ्गमुच्यते ॥ ३९ ॥ अनयोरैक्यविज्ञानं सम्बन्ध इति कथ्यते ॥ लिंगं शिवो नियन्ता ऽङ्गं प्रपञ्चः ससुरासुरः ॥ ४० ॥ तस्मिंस्तस्य लयस्थानं संबंध इति गीयते ॥ अतो लिङ्गाङ्गसम्बन्धपदार्थोऽस्मि शिवात्मकः ॥ ४१ ॥ सच्चिदानन्दसम्पूर्णस्वरूपोऽहमिति स्मरेत् ॥ एवं लिङ्गाङ्गसंबन्धपदानामर्थमुत्तमम् ॥ ४२ ॥ लब्ध्वा गुरूपदेशाद्यः सोऽयं लिङ्गाङ्गसङ्गवान् ॥ ८४ ॥ लिङ्गाङ्गसंबन्धपदार्थमेवं निश्चित्य सच्चित्सुखपूर्णरूपम् ॥ गुरूपदेशादपि तर्क-

---

असें मूढप्रश्नयास येतें. (३७)लिंग शिवाचें रूप आहे व अंग आनंदरूपिणी भवानीचें रूप आहे. आणि या दोहोंच्या परिपूर्ण ऐक्यभावासच संबंध अशी संज्ञा आहे. ( ३८ ) अंग ह्मणजे शक्ति, लिंग ह्मणजे शिव, असें ज्ञान अनन्यभक्ति केल्यानें उत्पन्न होतें. त्या ज्ञानासच संबंध असें ह्मणतात. अंग ह्मणजे शक्ति आणि लिंग हें शक्तिरूपच आहे. परतु शक्तीशिवाय लिंग दिसणार नाहीं ह्मणून लिंग शक्तिरूपच आहे असें मानण्यांत येतें. लिंग आणि अंग या पदांच्या ऐक्य भावास संबंध असें ह्मणतात. (३९) चराचर व सुरासुर सृष्टीचें नियमन करणारा तोच लिंगरूप शिव होय ह्मणून लिंगरूप शिवाचे ठायीं स्थावर जंगमात्मक सृष्टीचा जो लय होतो व त्या लयामुळें लिंग आणि सृष्टी यांचें जें ऐक्य होतें त्यासच संबंध ह्मणतात. (४०) ह्मणून लिंग अंग आणि संबंध हे तीन पदार्थ माझेंच रूप आहेत आणि मीही शिवस्वरूपच आहें. हा लिंग अंग संबंध या पदांचा स्पष्टार्थ आहे. ( ४१ ) या अन्वयें सच्चिदानंद स्वरूप मीच आहें. असें चिरकाल स्मरण ठेवावें. वर लिहिल्याप्रमाणें ज्याला गुरूपासून ज्ञान प्राप्त झालें आहे तोच फक्त लिंगांगसंगी ( लिंग धारण करणारा ) होय. ( ४२ ) याप्रमाणें सच्चिदानंद रूप " लिंग अंग संबंध " या पदांचा अर्थ जो गुरूपदेशानें किंवा ग्रंथादि वाचनाच्या विचारानें चित्तांत दृढ बाणवून

तो यो लिङ्गाङ्गसङ्गं कुरुते स योगी ॥ ४३ ॥ मङ्गलात्म-शिवलिङ्गधारणं सङ्गवर्जिततनुः कुरुते यः ॥ अङ्गजौर्वदहनं भवसिंधु सङ्गभङ्गतरलं प्रतरेत्सः ॥ ४४ ॥ प्राणरूप इति जीव उच्यते लिङ्गरूप इति शंकरः स्मृतः ॥ यस्तदैक्यमितिवेदितानयोः प्राणलिङ्गविदसौ शिवयोगी ॥ ४५ ॥ यस्यैतत्परमात्मवेदनमिदं लिङ्गाङ्गसम्बंधिनः प्रत्यग्भाति पदत्रयार्थकलितं शुद्धं सदानन्दकम् ॥ स श्रीकण्ठपदाब्जभक्तिभरितः स्वान्तः पुमानुर्वराम् त्यक्त्वा कर्मकलापमन्यविषयं वैधं निषिद्धं चरेत् ॥ ४६ ॥ लिंगांगमयमेवेदं जगत्सर्वं चराचरम् ॥ लिङ्गाङ्गव्यतिरेकेण नास्ति सर्वत्र किञ्चन ॥ ४७ ॥ इति भावानुसन्धानं यत्तल्लिङ्गार्चनं विदुः ॥ इतोन्यथार्चनं यस्तु कुरुते स पशुर्नरः ॥ ४८ ॥ वृ ॥ लिङ्गं शिवः प्राणसमाख्यमंग-

---

लिंग धारण करितो तोच खरा शिवयोगी होय. ( ४३ ) परम मंगलकारक शिवलिंग धारण करून संसारसंगरहित जो राहतो तो विषयसंबंधीं तापत्रय दावाग्नीनें दग्ध होत नाहीं व संसारसंगतीनें उत्पन्न होणाऱ्या विकल्परूप भवसिंधूंतील लाटांतून तो सहज बाहेर निघतो. ( ४४ ) जो प्राणरूप जीव व लिंगरूप शिव अशा जीव शिवांचे ऐक्याप्रत निश्चयेंकरून जाणतो तोच खरा प्राणलिंग जाणणारा व तोच खरा शिवयोगी. ( ४५ ) लिंग धारणकरणाऱ्या मनुजास जेव्हां परमात्म ज्ञान होतें व लिंग, अंग आणि संबंध या तीन पदांनीं दर्शित असा निर्मळ सच्चिदानंदात्मक अर्थवाद सर्वदां त्याचे प्रत्ययास येतो, तेव्हांच तो श्रीकण्ठाची भक्ति करण्यांत निमग्न होतो. व भक्तिविरहित अन्य विषयांचीं कर्में सोडून देऊन लोकदृष्टीनें निषिद्ध अशा प्रकारचे आचार सुद्धां त्याचे हातून घडतात. ( ४६ ) हें सर्व जगत्रय लिंगांगरूपच आहे. व सर्व ठिकाणीं लिंगांगाशिवाय दुसरें कांहींच नाहीं. (४७) या वरील अर्थाप्रमाणें जी दृढमति तिलाच लिंगपूजा असें ह्मणतात. व या शिवाय अन्य प्रकारानें जो पूजा करील तो नर जन्मास येऊन पशुरूपच आहे. ( ४८ ) लिंग हेंच शिवरूप आहे. पंचप्राणयुक्त जीव हेंच अंग

म् ॥ तास्मिन्लयस्तस्य कृतःपुरा यः ॥ स देशिकेन्द्रेण शिवैक्य भाजा ॥ तदर्चयेल्लिंगमनन्यचेताः ॥ ४९ ॥ तदेव हस्ताम्बुज-पीठमध्ये ॥ निधाय लिंगं परमात्मचिन्हम् ॥ समर्चयेदेकधियोपचारैर्नरः स बाह्यान्तरभेदभिन्नैः ॥ ५० ॥ धारयेत्समतां कंथां क्षमाख्यां भस्मगुण्टिकाम् ॥ दयाकमण्डलुं सत्यज्ञानदण्डं मनोहरम् ॥ ५१ ॥ वैराग्यभिक्षापात्रं च भक्तिभिक्षां च याचयेत् । लिंगांगसंगिनः शुद्धान्सदाचारान्वितान्नरान् ॥ ५२ ॥ एवं विचरतस्तस्य भवन्त्येते परिग्रहाः ॥ विद्याभार्या सुतस्तोषः क्षमा हि परिचारिका ॥ ५३ ॥ माता भक्तिः पिताचारस्सत्यं नप्ता शमः सखा ॥ वैराग्यं सुहृदाचार्यो दमः श्रद्धा स्वसा मता ॥ ५४ ॥ दासीत्वहिंसा दासः स्यादस्तेयं परिकीर्तितः ॥ मैत्र्याद्यास्तनयाः प्रोक्ता धर्मोऽसौ वाहनं मतम् ॥ ५५ ॥ ज्ञानं देहस्तथा क्षेत्रं विचारः सर्वगोचरः ।' देशो मोक्षः सुगम्योऽयं

---

आहे. ह्या शिवजीवांचें पूर्वीं ( सृष्टीलय कालीं ) ऐक्य होतेंच, परंतु शिवैक्य पूर्ण बाणलेलें आहे, अशा गुरुश्रेष्ठांनीं उपदेशसमयीं त्या जीव शिवांचें ऐक्य लिंगाचेच ठायीं सिद्ध केलें ह्मणून या लिंगाचीच अनन्यभावानें पूजा करावी. ( ४९ ) तेंच परमात्मरूप लिंग हस्तकमलावर ( तळहातावर ) धारण करून एकाग्र मनानें अंतर्बाह्य भेद सोडून अष्टविधा उपचारांनीं त्याची पूजा करावी. ( ५० ) समता हीच कंथा, क्षमा ही भस्माची गोळी, दया हाच कमंडलु, आणि सत्यज्ञान हाच मनोहर दण्ड धारण करावा. (५१)वैराग्य हेंच भिक्षापात्र घेऊन सदाचारसंपन्न लिंग धारण करणाऱ्या, व शुचिर्भूत अशा लोकांकडे जाऊन भक्तिरूप भिक्षा मागावी.(५२) याप्रमाणें जो आचरण करील त्यास विद्यारूप भार्या प्राप्त होते; संतोषरूप पुत्र प्राप्त होतो.क्षमा दासी व (५३)भक्ति माता, सदाचाररूप पिता, सत्य हाच श्वशुर, शमरूप मित्र, वैराग्यरूप आप्त, दमरूप गुरु, आणि श्रद्धारूप सासू, ( ५४ ) अहिंसा ( दुसऱ्यास कायावाचा मन या तिहींनीं दुःख न देणें ) हाच चाकर, सज्जनांची मैत्री हाच पुत्र, व धर्म हेंच वाहन, ( बसण्याकरितां ) ( ५५ ) ब्रह्मसद्वस्तूचें ज्ञान हाच कोणी एक

प्राणलिंगांगसंगिनः ॥ ५६ ॥ एतान् परिग्रहान् वत्स गृहीत्वा शुद्धमानसः ॥ परिपूर्णश्चिदानन्दश्चरेदुर्वीमिमां नरः ॥ ५७ ॥ ॥ वृ. ॥ लोभो महाकंटक इंद्रियाणि दुष्टारयो मोहमहापिशाचः ॥ क्रोधस्तरक्षुर्ममताहिकन्या मारःसचोरो मद अंधकारः ॥ ५८ ॥ तापत्रयं महागर्तो विषयाः कंटकांकुराः ॥ असूया विषवल्ली-स्यादहंकारो विषन्हदः ॥ ५९ ॥ एतानुपद्रवान् सर्वान् वि-चार्य स्वधिया नरः ॥ संसारकानने भक्तो विचरन् सुखमश्नुते ॥ ६० ॥ लिंगार्पितानि द्रव्याणि भुञ्जीयाद्यदि मानवः ॥ अन-र्पितानि द्रव्याणि वर्जयेद्भक्तिमान् नरः ॥ ६१ ॥ अनर्पितानि भुञ्जीयात्प्रमादाद्यदि मानवः ॥ कुर्यात्प्राणपरित्यागं पुत्रादीन्न-विचारयेत् ॥ ६२ ॥ अप्यापदि दुरंतायामन्यदेवार्पितं सुधीः ॥

---

देह, देशकाल इत्यादिकांनीं ज्याला बाधा नाहीं असें जें सत्स्वरूप हेंच कोणी एक शेत व मोक्ष हाच देश प्राप्त होतो. ( ५६ ) हे षडानना, वर वर्णन केलेले आप्त शुद्धान्तःकरणानें प्राप्त करून घेऊन सदानंदरूप हो-त्साता नरानें पृथ्वीवर संचार करावा. ( ५७ ) आपल्या बुद्धिबलानें लो-भ हाच महाकंटक, इंद्रियें हेंच दुष्ट शत्रु, मोह हेंच भयंकर वाघ, ममता हीच मुलगी, मदन हाच अंधार; ( ५८ ) आध्यात्मिक ( मानसिक ), आधिदै-विक ( भूत पिशाचांदिकांपासून होणारे ) व आधिभौतिक ( रोगापासून होणारे ) असे तीन प्रकारचे ताप हीच एक मोठी खांच, शब्दस्पर्शादि विषय हेच कांट्यांचे बारीक मोड, असूया ( हेवा ) हीच विषाची वेल, अंहकार हाच विषाचा डोह ( ५९ ) ह्या सर्व उपद्रवांचा निरास ( ना-हींसें करून ) करून जो शिवभक्त या संसाररूपी वनांत वास करील त्यास अखंड सुख प्राप्त होईल. ( ६० ) प्रत्येक लिंगधारी मनुष्यानें भ-क्षण करण्याचे, पिण्याचे अगर चाटण्याचे पदार्थ लिंगास मोठ्या आदरानें समर्पण करावेत आणि मग ते भक्षण करावे. लिंगास अर्पण न केलेले पदार्थ भक्षण करूं नयेत. ( ६१ ) लिंगास समर्पण न केलेले पदार्थ जर मनुष्य चुकूनही भक्षण करील तर त्यानें पुत्रास सुद्धां न विचारतां प्राण सोडून द्यावे. ( ६२ ) अति संकटसमयीं सुद्धां दुसऱ्या देवास स-

न भुञ्जीयात्प्रमादेन भुंक्ते स पतितो भवेत् ॥ ६३ ॥ पात्रस्थं शिवभुक्तं यद्भुञ्जीयात्तदतन्द्रितः ॥ भाण्डस्थं न तु भुञ्जीयाद्यदि भुंक्ते स पापभुक् ॥ ६४ ॥ नेक्षेत सर्वदा मर्त्यः शिवादन्यत्तु दैवतम् ॥ नान्यदेवार्चकान् मर्त्यान् सदाशिवबहिष्कृतान् ॥ ६५ ॥ लिङ्गाङ्गसङ्गिनः शुद्धान् सदाशिवपतिव्रतान् ॥ पूजयेदादरेणैव श्रद्धाभक्तिसमन्वितः ॥ ६६ ॥ धारयेदवधानेन लिङ्गं सद्गुरुणार्पितम् ॥ प्रमादात्पतिते लिंगे प्राणानपि परित्यजेत् ॥ ६७ ॥ पतिते प्राणलिंगे यो धत्ते प्राणान्नराधमः ॥ स चण्डाल इति ज्ञेयः शिवद्रोही न तं स्पृशेत् ॥ ६८ ॥ न तस्य सूतकं वत्स प्राणलिंगांगसंगिनः ॥ जननोत्थं मृतोत्थं च विद्यते परमार्थतः ॥ ६९ ॥ कुलजात्यादयो भावा धर्मो देहस्य नात्मनः ॥

---

मर्पण केलेले पदार्थ भक्षण करूं नयेत आणि चुकून जर तो ते भक्षण करील तर तो शिवाचारभ्रष्ट झाला असें समजावें. ( ६३ ) गुरूंनीं ( जंगमांनीं ) उच्छिष्ट दिलेलें अन्न घेऊन, ताटांत वाढलेलें अन्न शिवास समर्पण केल्यावर, तें अन्न भक्षण करावें. शिवास अर्पण न केलें असल्यास व गुरूचें ( जंगमाचें ) उच्छिष्ट ( उष्टें ) अन्न नसल्यास तें भक्षण करूं नये. आणि जर तसें अन्न तो भक्षण करील तर तो पापी होईल. ( ६४ ) मनुष्यानें शिवाशिवाय इतर दैवतांचें दर्शन घेऊं नये. त्याचप्रमाणें सदाशिवानें ज्यांचा त्याग केला आहे असे लोक आणि इतर देवतांची भक्ति करणारे लोक यांचेंही मुखावलोकन करूं नये. (६५) श्रद्धापूर्वक व भक्तिपूर्वक, मनुष्यानें सदाशिवाची पतिभावानें भक्ति करणारे, व लिंग धारण करणारे अशा जनांची आदरानें भक्ति करावी. ( ६६ ) सद्गुरूंनीं दिलेलें लिंग प्रेमानें धारण करावें, व तें लिंग जरी चुकून खालीं पडलें तरी प्राणसुद्धां सोडून द्यावेत. ( ६७ ) प्राणलिंग पतन पावलें तर जो नराधम जीव ठेवितो तो चांडाळ व शिवाचा वैरी आहे असें समजावें, व त्यास स्पर्शही करूं नये. ( ६८ ) हे वत्सा षडानना, असें प्राणलिंग धारण करणाऱ्या जनांनां सोयर किंवा सूतक ( जनन आणि मृत्यु सूतक ) मुळींच नाहीं. ( ६९ ) कुल, जाति, यौवन, आदिकरून

प्रत्यक्त्वाद्बोधरूपत्वात्पूर्णत्वाच्छिवरूपतः ॥ ७० ॥ तथापि स्वकुलाचारं लौकिकं वैदिकं तु वा ॥ सावधानेन कुर्वीत शिवार्चेनधिया नरः ॥ ७१ ॥ यावत्प्रारब्धकर्मोत्थः संसारः प्रतिभासते ॥ तावत्कुर्वीत कर्माणि वेदतंत्रोदितानि च ॥ ७२ ॥ यथा वृक्षफलं वृक्षात्पतनं लभते स्वतः ॥ तथा सर्वाणि कर्माणि पतन्ति शिवयोगिनः ॥ ७३॥ स्वप्नकाले कृतं पापं ब्रह्महत्यादिकं च यत् ॥ यथा प्रबोधसमये तन्मिथ्या भवति स्वयम् ॥ ७४ ॥ तथा कृतं महापापं लिङ्गधारणतः पुरा ॥ यदस्ति तल्लयं याति लिङ्गधारणतः परम् ॥ ७५ ॥ अनेन सदृशं धर्मं न पश्यामि षडानन ॥ वेदतंत्रपुराणेषु सत्यं सत्यं मयोदितम् ॥ ७६ ॥ वृ. ॥ कांक्षन्ति सर्वे पितरः कुले नः सम्भूय पुत्राः शिवभक्तियुक्ताः ॥ सन्तो भविष्यन्ति विशुद्धभावास्तेषामथैको विभृयाच्च लिंगम् ॥ ७७ ॥ तस्य प्रभावाद्वयमीशलोकं प्राप्यामहेऽनंतसुतृप्ति-

---

सर्व भाव देहाला आहेत. कारण, देहादि उपाधिरहित आत्मा हा ज्ञानरूप व शिवरूप आहे; देहादि उपाधींपासून त्याचें भिन्नत्व दिसून येतें व त्याचें अविच्छिन्नत्व ह्मणजे पूर्णत्वही समजण्यांत येतें. ( ७० ) असें आहे तरी श्रुतिस्मृति पुराणादि आगमोक्त आचार व रूढींत असलेले आचारही लक्षपूर्वक आचरण करावे. ( ७१ ) प्रारब्ध कर्मांनीं प्राप्त झालेला संसारपाश जोंपर्यंत सुटत नाहीं तोंपर्यंत वेद, तंत्र, वगैरे ग्रंथांत वर्णन केलेलीं कर्में करावीं. ( ७२ ) ज्याप्रमाणें एखाद्या झाडावरून त्या झाडाचें फळ आपोआप खालीं पडतें, त्याचप्रमाणें शिवयोग्याचीं कर्में आपोआप सुटतात. ( ७३ ) स्वप्नांत घडलेलें ब्रह्महत्येचें पातक जसें जागृतिकालीं ( जागें झाल्यावर ) नाहींसें होतें, तसें ( ७४ ) शिवलिंग धारण करण्याचे पूर्वी जें महापातक केलेलें असतें तें लिंग धारणकेल्यावर नाश पावतें. ( ७५ ) श्रीशंकर ह्मणतात हे षडानना, खरोखर ह्या धर्मासारखा दुसरा कोणताही धर्म, वेदतंत्र पुराण इत्यादि ग्रंथांत माझे पाहण्यांत आला नाहीं. ( ७६ ) पितृलोकांत सर्व पितरांची हीच इच्छा असते कीं, आमच्या वंशांत शिवभक्तिसंपन्न पुत्र उत्पन्न व्हावेत व त्यांमध्ये एकानें तरी शिवलिंग धारण करावें. ( ७७ ) असा जो एक लिंगधारक

भाजः ॥ इत्थं स्वलोके वसतिं गतास्ते कांक्षंति नित्यं पितरः शिवैक्यम् ॥ ७८ ॥ यत्र तिष्ठति लिंगाङ्गसंबंधीशपरायणः ॥ निमिषं निमिषार्धं वा तच्छिवक्षेत्रमुच्यते ॥ ७९ ॥ लिंगाङ्गसंगिनः पुंसो ये दृग्विषयवर्तिनः ॥ ते सर्वपापनिर्मुक्ता यास्यन्ति परमां गतिम् ॥ ८० ॥ लिंगाङ्गसंगिनं मर्त्यं लिङ्गध्यानपरायणम् ॥ अनुव्रजति यो मर्त्यः सो पि मुक्तिमवाप्नुयात् ॥ ८१ ॥ धृतलिंगस्य मर्त्यस्य पादप्रक्षालितं जलम् ॥ पापशुध्द्यर्थमज्ञानां तीर्थं च शिखिवाहनं ॥ ८२ ॥ प्राणलिंगैक्यनिष्ठस्य देहं स्पृष्ट्वा समीरणः ॥ यत्र गच्छति तत्रस्था मर्त्या मुक्ता न संशयः ॥ ८३ ॥ युगपच्छिवलिंगैक्यपादस्पृष्टरजांसि च ॥ पतन्ति मस्तके यस्य स मुक्तो नात्र संशयः ॥ ८४ ॥ अन्नं वा जलमात्रं वा यद्दत्तं

---

उत्पन्न होईल त्याच्या पुण्याईनें तरी आह्मांस शिवसायुज्य प्राप्त होईल व अंतीं आह्मी शिवैक्य ( श्रीशिवाशीं एकरूप ) होऊन जाऊं. ( ७८ ) श्रीशिवभक्त व शिवलिंगधारण करणारा ज्या ठिकाणीं एक निमिष ( पापणी मिटल्यापासून उघडण्यास लागणारा वेळ ) किंवा अर्ध निमिष वास करील त्या स्थानास शिवक्षेत्र ह्मणतात. ( ७९ ) त्याचप्रमाणें लिंग धारण करणाऱ्याच्या दृष्टीस जे जे लोक पडतील ते सर्व पापांपासून मुक्त होऊन परमपदाला जातील. त्यांस मोक्ष प्राप्त होईल. ( ८० ) लिंगाचें ध्यान करणारा किंवा लिंग धारण करणारा ह्या दोघांचें जो अनुकरण करितो, त्यास सुद्धां मोक्ष प्राप्त होतो. ( ८१ ) लिंग धारण करणाऱ्याचें पादोदक हें तीर्थच आहे. व हे कार्तिकस्वामिन् हें तीर्थ अज्ञ लोकांस पापरूपी मलापासून शुद्ध होण्यास फारच उत्तम आहे. ( ८२ ) प्राणलिंग धारण करणाऱ्या एकनिष्ठ मनुष्याचें शरीराला स्पर्श करून वारा जरी गेला तरी ज्या ज्या ठिकाणीं तो वारा जाईल त्या त्या ठिकाणचे लोकही मुक्त होतील. ( ८३ ) शिवलिंग धारण करणाऱ्याची चरणधूलि जरी एखाद्या मनुष्याचे मस्तकावर पतन पावली, तरी तो मनुष्य मोक्षास पात्र होतो. ( ८४ ) मेरुपर्वताएवढें अन्नदान केल्यानें

लिङ्गधारिणे ॥ तदन्नं मेरुसदृशं तज्जलं सागरोपमम् ॥ ८५ ॥ लिङ्गाङ्गसंगं कुर्वन्तं स्पृष्ट्वा द्विजवरं रविः॥ स्थानाच्चलत्ययं भित्वा मण्डलं मे व्रजेच्छिवम् ॥ ८६ ॥ शिवलिंगांगसंबन्धभाजां दर्शनमात्रतः ॥ मुक्तिं गच्छन्ति मनुजाः पशुपक्षिमृगादयः ॥ ८७ ॥ तेषां संरक्षणं यस्तु कुरुते मनुजोत्तमः ॥ स धन्यः स कृतार्थः स्यात्स शिवैक्यपदं व्रजेत् ॥ ८८ ॥ तस्मात्सर्वं परित्यज्य सर्वभावेन सर्वदा ॥ पूजयेदादरेणैव द्विजं लिंगांगसंगिनम् ॥ दुर्लभास्त्रिषु लोकेषु प्राणलिंगांगसंगिनः ॥ पूर्वजन्मकृतात्पुण्यात्केषांचित् सुलभा भुवि ॥ ९० ॥ यैः पुराराधितः शंभुर्भक्तिप्रणतमानसैः ॥ तैरेव लभ्यः पुण्यात्मा शिवलिंगांगसंगभाक् ॥ ९१ ॥ यः पूजयति लिंगांगध्यानासक्तधियं द्विज-

---

जितकें पुण्य लागतें किंवा सागरांतील जलाइतकें जल दिल्यापासून जितकें पुण्य लागतें, तितकेंच किंबहुना अधिक पुण्य लिंगधारकास अन्न किंवा पाणी दिल्यानें लागतें. ( ८५ ) लिंग धारण करणाऱ्या ब्राह्मणाला पाहून हा लिंगधारक कदाचित् माझें मण्डल भेदून शिवलोकास जाईल कीं काय या भीतीनें सूर्य आपल्या स्थानापासून पुढें सरतो. ( ८६ ) फार तर काय, पशु, पक्षि, मृगसुद्धां शिवलिंग धारण करणाऱ्यांचे दर्शनानेंच मुक्त होतात; मग मनुष्य होतीलच होतील यांत काय विशेष ? ( ८७ ) जो मनुष्य लिंगधारकांचें संरक्षण कारितो तोच धन्य व कृतार्थ होतो व तोच शिवस्वरूपाशीं लीन होऊन अंतीं शिव होईल. ( ८८ ) याकारितां इतर सर्व कामें बाजूला ठेऊन लिंगधारण करणाऱ्या द्विजाची ( ब्राह्मणाची ) मोठ्या प्रेमानें व सत्कारपूर्वक आसनादि दक्षणा देऊन पूजा करावी. ( ८९ ) प्राणलिंग धारण करणारे जन ह्या त्रिजगतांतही मिळणें दुर्धट आहे. आतां फक्त पूर्व पुण्याईनेंच कोणाकोणास ते सुलभ होतात. ( ९० ) ज्या जनांनीं पूर्व जन्मीं शंकरांची आराधना भक्तियुक्त चित्तानें केली आहे, त्यांनांच शिवलिंगधारी पुण्य पुरुषाचा सहवास घडतो. ( ९१ ) हे वत्सा, लिंगांगाचें ध्यान करणाऱ्या द्विजाची ( ब्राह्मणाची ) जो पूजा करितो त्याला पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं

म् ॥ पुनर्भवो न तस्यास्ति सत्यं सत्यं मयोदितम् ॥ ९२ ॥ एतस्मादपरोधर्मः सोऽधर्म इति मे मतिः ॥तस्मात्सर्वप्रयत्नेन धर्ममाश्रय सर्वदा ॥ ९३ ॥ वृ० ॥ इदमतिपरमानन्दात्मबोधानुषंगं ॥ परममतिरहस्यं वेदतंत्रप्रसिद्धम् ॥ भुवनजनहितार्थं प्राणलिंगैक्यधर्मं ॥ सकलसुजनसेव्यं भाषितं मुक्तिदं ते ॥ ९४ ॥ त्वमप्येतन्महाभाग सर्वलोकविवर्जितम् ॥ धर्मं कथय विप्राय प्राणलिंगांगसंगिने ॥ ९५ ॥

॥ सूत उवाच ॥

श्रुत्वाधर्ममिमं परात्परतरं संसारसंशोषणम् ॥ लिंगांगोत्तमसंगमर्थललितं निर्वाणसौख्यप्रदम् ॥ स्कन्दो भक्तिसुधाभिलापनिरतः शर्वं भवानीधवम् ॥ ब्रह्मेन्द्राच्युतपूजितांघ्रिकमलं नत्वाऽभवद्ध्यानवान् ॥ ९६ ॥ भक्त्या परवशो भूत्वा स्कन्दस्तुष्टाव शंकरम् ॥ गंगाधरं विरूपाक्षं गिरीन्द्रतनुजाधवम् ॥ ९७ ॥ नमः शिवाय सोमाय भक्तापदपहारिणे ॥

---

हें मी तुला निश्चयानें सांगतों. ( ९२ ) ह्या धर्माशिवाय इतर जे धर्म आहेत ते केवळ अधर्मच आहेत. करितां शक्य तेवढा प्रयत्न करून ह्या धर्माचा नेहमीं आश्रय करावा. ( ९३ ) हे वत्सा षडानना, वेदतंत्रादि ग्रंथांत प्रसिद्ध, सज्जनांनां प्रिय, मुक्तिदायक, परमात्मज्ञानदायक, व सर्व धर्मांचें रहस्य, असा हा प्राणशिवैक्य धर्म, लोकहितार्थ मीं तुला सांगितला. ( ९४ ) हे महाभाग्यशाली षडानना, सर्व लोकांना अज्ञात असलेला असा हा धर्म, प्राणलिंग धारण करणाऱ्या विप्रालाच ( ब्राह्मणाला ) तूं सांग. ( ९५ ) सूत सांगतात शौनकादि ऋषीहो, श्रीशंकरांनीं कथन केलेला हा धर्म संसारनाश करणारा आहे, अन्तीं सुखदायक आहे, व ह्यांत लिंग आणि अंग ह्या पदांचा अर्थ विशेष स्पष्ट करून सांगितला आहे. असा हा धर्म श्रवण करून कार्तिकस्वामी भक्तिरूप अमृतसमुद्रांत मग्न झाले. व ब्रह्मदेव, विष्णु, इंद्रादि देवांनीं श्री अंबिकापति शंकरांची पूजा केल्यावर आपणही नमस्कार करून ध्यानस्थ झाले. ( ९६ ) व भक्तीनें सद्गदितकण्ठ होऊन पार्वतीपति शंकरांची स्तुति पुढें वर्णन केल्याप्रमाणें करूं लागले. ( ९७ ) भक्तांचा संकटें निवारणाऱ्या शंकरानां मी

विद्यारूपाय देवाय नीलकण्ठाय शूलिने ॥ ९८ ॥ नित्यानन्दं निराधारं निर्विकल्पं निरंजनम् ॥ निग्रहानुग्रहकरं जगतां नौमि शंकरम् ॥ ९९ ॥ सृष्टिस्थितिविनाशानां हेतुभूतमहेतुकम् ॥ वन्दे सच्चित्सुखात्मानं कलानिधिकलाधरम् ॥ १०० ॥ नागालंकृतसर्वांगं जटामुकुटमण्डितम् ॥ गिरिजारमणं वन्दे गिरिशं गीतवत्सलम् ॥ १०१ ॥ दक्षाध्वरध्वंसकरं महाताण्डवमण्डितम् ॥ महामहेश्वरं वन्दे तापत्रयविवर्जितम् ॥ १०२ ॥ विश्वेश्वरं विरूपाक्षं विश्वरूपधरं हरम् ॥ भतयोनिं महेशानं वन्दे त्र्यंबकमव्ययम् ॥ १०३ ॥ कलातीतं कलाधारं कोटिसूर्यसमप्रभम् ॥ कामावलेपविध्वंसं वरदं वासवार्चितम् ॥ १०४ ॥ सर्वा-

---

नमस्कार करितों. ( ९८ ) नेहमीं आनंदरूप, निराधार, निर्विकल्प, निरंजन, भक्तजनांवर अनुग्रह करणाऱ्या श्रीनीलकण्ठाला मी नमस्कार करितों. ( ९९ ) जग उत्पन्न करणें, पालन आणि लय करणें ह्या शक्तींनां हेतुभूत ह्मणजे कारण असूनही अहेतुक ज्याची स्थिति आहे, ह्मणजे ज्याला कोणी कारण नाहीं.( उदाहरण प्रतिबिंब पाडावें अशी इच्छा नसूनही, पृथ्वीवरील जलादि विशेषांत सूर्याचें प्रतिबिंब पडतें तसें हेतु नसतांही जगाला हेतुभूत झालेले)अशा श्रीशंकरांनां व सच्चित्सुखांत निमग्न असलेल्या श्रीशंकरांना नमस्कार करितों.( १०० )सर्व शरीरावर नागाचीं भूषणें शोभत आहेत, जटांचा मुकुट धारण केला आहे, गायनाची फार आवड आहे, अशा श्रीशंकरांना मी नमस्कार करितों.( १०१ )दक्ष प्रजापतीच्या यज्ञाचा नाश केला आहे, महानृत्य करण्यांत प्रवीण आहेत, आध्यात्मिक, आधिभौतिक, आधिदैविक तापांपासून मुक्त असलेल्या शंकरांना मी नमस्कार करितों. ( १०२ ) विश्वेश्वराला, विरूपाक्षाला, विश्वरूपाला, भूतांचें उत्पत्तिस्थानभूत अशा महेश्वराला वंदन करितों. ( १०३ ) कोटिसूर्यांप्रमाणें तेजस्वी व षोडशकलात्मक चंद्राला आधारभूत व मदनाच्या गर्वाचा नाश करणाऱ्या शिवाला व अभीप्सित वर देणाऱ्या व इंद्रानें पूजिलेल्या श्रीशंकरांना नमस्कार करितों. ( १०४ ) जगदाधारक, आनंदरूपात्मक व सर्वांचा नियामक व आधार-

धारं सदानन्दं सर्वज्ञं सर्वनायकम् ॥ सर्वोपद्रवनिर्मुक्तं वन्दे शम्भुं जगत्पतिम् ॥ १०५ ॥

॥ सूत उवाच ॥

इति स्तुत्वा महादेवं भक्तिनम्रेण चेतसा ॥ स्कन्दो लिंगांगसंबन्धपदाभिज्ञो वभूव सः ॥ १०६ ॥ भवन्तोऽपि महाप्राज्ञाः सदाशिवपतिव्रताः ॥ भवन्तु प्राणलिंगांगसंबन्धपदवेदिनः ॥ १०७ ॥ यूयं श्रद्धान्विताः पुत्राः शिष्यैः परिवृता द्विजाः ॥ स्थापयध्वमिमं धर्मं मोक्षसोपानपद्धतिम् ॥ १०८ ॥ स्थापितेऽस्मिन्महाधर्मे शैवे संसारवाधके ॥ जगत्सर्वमिदं विप्राः सुस्थितं भवति ध्रुवम् ॥ १०९ ॥ धर्मं स्थापयितुं पुंसो यतमानस्य हि द्विजाः ॥ रक्षणं कुरुते यस्तु सोऽपीश्वरपदं व्रजेत् ॥ ११० ॥ यः शाम्भवमहाधर्मस्थापनार्थं त्यजेदसून् ॥ स गणेशत्वमाप्नोति शंकरस्य प्रसादतः ॥ १११ ॥ यदा यदा हि धर्मस्य हानिः शैवस्य जायते ॥ तदा तदाऽवता-

---

भूत अशा श्रीशंकरास नमस्कार करितों. ( १०५ ) सूत ह्मणतात हे-सनकादि ऋषिहो, याप्रमाणें महादेवाची भक्तिपूर्वक स्तुति करून षडानन लिंगांगपदाचा पूर्ण अर्थ जाणता झाला. ( १०६ ) श्रीशंकरांना पतिभावानें भजणारे असे महाज्ञानवान् मुनिजनहो, तुह्मीही याप्रमाणें प्राणलिंग, अंग, आणि संबंध यांचें पूर्ण ज्ञान संपादन करा. ( १०७ ) शिष्य, पुत्र पौत्रादिकांसहवर्तमान असे ऋषिहो, हा मोक्षमार्ग दाखविणारा धर्म तुह्मी स्थापन करा. ( १०८ ) संसारतापनाशक असा हा शैवधर्म स्थापन कराल तर हें सर्व जगत् निश्चयानें सुखी होईल. ( १०९ ) हे द्विजजनहो, याप्रमाणें शैवधर्म स्थापन करणाऱ्याचें जो रक्षण करील तोही परमेश्वरपदाला जाऊन पोंचेल. ( ११० ) शैवमहाधर्म स्थापन करण्याकरितां जो आपले प्राण खर्च करील त्याला श्रीशंकरप्रसादानें शंकरगणांतील श्रेष्ठ पद प्राप्त होईल.( १११ )ज्या ज्या वेळीं या शैवधर्माचा ऱ्हास होईल त्या त्या वेळीं गणेशाचा( प्रमथगणश्रेष्ठाचा)

रोऽयं गणेशस्य महीतले ॥११२॥ वृ० ॥ यदा यदा प्राणशिवैक्यभाजां हानिर्भवेद्भूमितलेऽवतीर्य ॥ तदा तदा मर्त्यकुले गणेशाः संभूय कुर्वन्ति हि धर्मसंस्थाम् ॥ ११३ ॥ धर्मग्लानिरभूद्यदा शिवगणा नानाकुलेषूत्थिताः भूमौ शंकरनिंदकानघवतस्तद्धर्मविध्वंसकान् ॥ शिक्षन्तः शिवधर्ममार्गमखिलं संस्थाप्य लिंगार्चकान् सत्कृत्वा सकलान् जनानिह पुनः शम्भुं समेष्यन्ति ते ॥ ११४ ॥ यः शैवशास्त्रकथनं प्रकटीकरोति लिंगांगसंगविषयं परमार्थभूतम् ॥ लोके तु दुर्जनघने स हि लिंगधारी माहेश्वरः श्रुतिपुराणविदागमज्ञः॥११५॥पौराणीं शिवसंकथां श्रुतिमतां सर्वागमार्थान्विताम् तां यो रक्षति तेन रक्षितमिदं त्रैलोक्यमीशो हि सः ॥ सर्वस्य प्रियकृत्सदा भवति सः श्रीमान्सदानन्दचित्संज्ञो भासत एव सर्वसुखदः श्रीनन्दिमुख्य-

---

अवतार धर्मस्थापनेकारितां या पृथ्वीवर उत्पन्न होईल. ( ११२ ) ज्या ज्या वेळीं प्राणशिवैक्य करणारे सज्जन ह्या पृथ्वीवरून नाहींसे होतील त्या त्या वेळीं श्रीशंकराचे गणाधिप मानवकुळांत जन्म घेऊन धर्म स्थापन करितील. ( ११३ ) ज्यावेळी धर्माचा ऱ्हास होईल व जगतीतलावर शिवधर्मनिंदक उत्पन्न होतील व धर्माची अवनति करणारे पापी जन उत्पन्न होतील त्यावेळीं अनेक कुळांचे ठायीं शिवगण उत्पन्न होऊन शिवधर्म मार्गाचें लोकांस ज्ञान करून देऊन शिवधर्म स्थापन करितील व लिंगपूजा करणाऱ्याचा पूर्ण आदर सत्कार करून शेवटीं शंकरपदाला जातील. ( ११४ ) लिंग, अंग, संग, या पदांचा अर्थ प्रकट करणारें शैव शास्त्र जो जाणतो व जो लोकांस सांगतो तोच या पापीजनांच्या समुदायांत श्रुति, पुराण, वेद, वगैरे जाणणारा व लिंगधारण करणारा खरा माहेश्वर ( जंगम ) होय. ( ११५ ) पुराणांतील किंवा श्रुतींना संमत व सर्व आगमांत कथन केलेल्या अशा कथा जो रक्षण करील त्यानें प्रत्यक्ष जगत्त्रयच रक्षण केल्याप्रमाणें होणार आहे. व तो ह्या जगत्त्रयाचा स्वामीच होईल व शंकरांना प्रिय व नेहमीं आनंदयुक्त असून सर्वांस आनंद देणारा ही पदवी त्याला चांगली शोभेल. व श्रीनंदि आदिकरून सर्व शिवगणांना तो प्रिय

प्रियः ॥ ११६ ॥ यः स्थापयितुमुद्युक्तः श्रद्धयैवाक्षमोऽपि सन् ॥ इमं शैवं महाधर्मं सोऽपि मुक्तिमवाप्नुयात् ॥ ११७ ॥ शक्तो यः स्थापितुं धर्ममुपेक्षां कुरुते नरः ॥ सोऽसिपत्रवनं नाम नरकं प्रतिपद्यते ॥ ११८ ॥ तस्माच्छिवकथावक्तॄन्रक्षेत्सर्वप्रयत्नतः ॥ तद्रक्षणाद्भविष्यन्ति मर्त्या धर्मपरायणाः ॥ ११९ ॥ यूयं श्रद्धान्विता विप्रा रक्षध्वं सर्वभावतः ॥ शिवागमरहस्यज्ञान् शिवलिंगार्चनापरान् ॥ १२० ॥ य इमं पठते ध्यायन् नरो भक्तिसमन्वितः ॥ स सम्यग्ज्ञानवान्भूत्वा शिवसायुज्यमाप्नुयात् ॥ १२१ ॥ शृणोति पूजावेलायां श्रावयेद्वा समाहितः ॥ प्रसीदति शिवस्तस्य नीलकण्ठोऽम्बिकापतिः ॥१२२॥ न वक्तव्यमिदं शास्त्रं भक्तिहीनाय पापिने ॥ नास्तिकाय मनुष्याय श्रद्धाहीनाय सर्वदा ॥१२३॥

इति स्कन्दपुराणे शंकरसंहितायामुपरिभागे त्र्यशीतितमोऽध्यायः ॥

---

होईल. ( ११६ ) असमर्थ असतांही श्रद्धाभक्तियुक्त अंतःकरणानें हा धर्म स्थापन करण्याविषयीं जो उत्सुक होईल त्यासही मोक्ष प्राप्त होईल. ( ११७ ) व अंगीं सामर्थ्य असतांना जो धर्मस्थापन करण्याची हयगय करील त्याला "असिपत्रवन" नांवाचा नरक प्राप्त होईल. ( ११८ ) ह्मणून होईल तितका प्रयत्न करून शिवकथा वर्णन करणाऱ्यांचें रक्षण करावें त्यांचें रक्षण केल्यापासून मनुष्य धर्मपरायण होतो. (११९) ह्मणून श्रद्धायुक्त ऋषिजनहो, शिवलिंगपूजा करणाचें व शिवागमांतील रहस्यज्ञान जाणणारांचें भक्तिभावानें रक्षण करा. ( १२० ) जो मनुष्य या रहस्याचा पाठ करील व ह्या रहस्याचें ध्यान करील त्याला ब्रह्मज्ञान प्राप्त होऊन अंतीं शिवसायुज्यमुक्ति प्राप्त होईल. ( १२१ ) पूजा करण्याचे वेळीं जो ही कथा श्रवण करील किंवा दुसऱ्याला सांगेल त्याच्यावर अंबिकापति श्रीनीलकण्ठ प्रसन्न होईल (१२२) भक्तिहीनाला व पाप्याला हें रहस्य कथन करूं नये. त्याचप्रमाणें नास्तिकाला किंवा श्रद्धा नसणाऱ्यालाही हें कधींहि सांगूं नये.(१२३)

याप्रमाणें शंकरसंहितेंतील ८३ वा अध्याय समाप्त झाला.

॥ श्रीशिवायनमः ॥

॥ ऋषय ऊचुः ॥

भवता कथिता वृत्तिर्वीरमाहेश्वरोचिता ॥ अस्माकं सांप्रतं विद्वन् वद षट्स्थलनिर्णयम् ॥ १ ॥

॥ सूत उवाच ॥

वक्ष्ये भाग्यवतां श्रेष्ठाः षट्स्थलानि समासतः ॥ यानि शक्तिधरायाह श्रीकण्ठःपार्वतीपतिः ॥ २ ॥ पुरा कैलासशिखरे नानारत्नविभूषिते ॥ समासीनं महादेवं पार्वत्या सहितं शिवम् ॥ ३ ॥ गंगाधरं विरूपाक्षं श्रीकण्ठममितौजसम् ॥ पप्रच्छ प्रणतो भूत्वा स्कन्दः षट्स्थलनिर्णयम् ॥ ४ ॥

॥ स्कन्द उवाच ॥

देवदेव महादेव वद षट्स्थलनिर्णयम् ॥ कृपया तव देवेश भवामि भजकोत्तमः ॥ ५ ॥

॥ श्रीशंकर उवाच ॥

वक्ष्यामि संग्रहेणाहं श्रृणु षट्स्थलनिर्णयम् ॥ सारं समस्तशा-

---

सनकादिक ऋषि विचारतात भो सूत ऋषिहो; आपण वीरमाहेश्वरांनां योग्य असे आचार आह्मांस निवेदन केलेत. करितां हल्लीं षट्स्थलांचा निर्णय आह्मांस सांगण्यास तुह्मी समर्थ आहांत. ( १ ) सूत सांगतात सनकादि ऋषिहो षट्स्थलांची संपूर्ण माहिती पूर्वीं भवानी पतीनीं कार्तिकस्वामीस निवेदन केली होती तीच तुह्मांस मी कथन करितों. ( २ ) पूर्वीं विविध रत्नांनीं सुशोभित दिसणाऱ्या कैलास पर्वताच्या शिखरावर श्रीशंकर पार्वतीसहवर्तमान बसले असतां ( ३ ) स्कंदांनीं अतिशय तेजस्वी अशा श्रीशंकरांना नमस्कार करून षट्स्थलांची संपूर्ण माहिती सांगण्याविषयीं श्रीशंकरांची विनंती केली. ( ४ ) स्कन्द विचारतात हे देवाधिदेव, षट्स्थल ( सहा स्थलें ) निर्णय मला आपण सांगा व आपल्या कृपाप्रसादानेंच मी भक्तश्रेष्ठ पदवीला जाऊन पोंचेन. ( ५ ) श्रीशंकर ह्मणतात षडानना, षट्स्थलांचा निर्णय मी तुला तात्प-

स्त्रेषु रहस्यं च षडानन ॥ ६ ॥ सर्वेषां स्थानभूतत्वाल्लयभूतत्वतः सदा ॥ तत्वानां महदादीनां स्थलमित्यभिधीयते ॥ ७ ॥ स्थीयते लीयते यस्मिन्मुक्तिः संसारपद्धतिः ॥ तदेव स्थलमित्युक्तं स्थलतत्वविशारदैः ॥ ८ ॥ स्थाने सर्वाश्रयेऽनंत्ये सच्चिदानंदरूपिणि ॥ यस्मिन्ब्रह्मणि लीयेत प्रपंचस्तत्स्थलं स्मृतम् ॥ ९ तद्ब्रह्मस्थलशब्देन स्वशक्त्या षड्विधं भवेत् ॥ मोक्षमार्गैकसोपानं वीरमाहेश्वरादृतम् ॥ १० ॥ तस्य नामानि वक्ष्यामि स्वरूपं ते समासतः ॥ यद्ज्ञानेन नरो मुक्तिमनायासेन गच्छति ॥ ११ ॥ भक्तो माहेश्वरश्चैव प्रसादी प्राणलिंगिकः ॥ शरणः शिवलिंगैक्यः षट्स्थलं च मम प्रियम् ॥ १२ ॥ सदाचारे शिवे भक्तिर्लिंगे जंगम एकधीः ॥ लांच्छने शरणे भक्तिस्तद्भक्तस्थल-

---

र्यानें सांगतों. हें सर्व शास्त्रांतील सार आहे व गोप्यही आहे. ( ६ ) प्रथमतः स्थल शब्दाची व्याख्या सांगतों. महदादि पंचतत्त्वांचा ह्मणजे मूल प्रकृतिपासून उत्पन्न झालेल्या बुद्धि आणि अहंकारादि महत्तत्वांचा व तदंगभूत पंचतत्वांचा व सप्त लोकांचा उद्गम ( उत्पत्ति ) आणि लय त्याच स्थानांत होतो, ह्मणून त्या स्थानास स्थल असें ह्मणतात. ( ७ ) त्याचप्रमाणें संसारपरंपरा ज्याचे ठायीं लय पावते व मुक्ति स्थिर होते त्याला स्थलतत्व जाणणारे ज्ञाते लोक स्थल असें ह्मणतात. ( ८ ) सच्चिदानंदरूप अनंत व सर्वांस आधारभूत असें जें ब्रह्मचिन्मात्र व ज्या ब्रह्माचे ठायीं सर्व प्रपंचाचा लय होतो त्यास " स्थल " असें ह्मणतात. ( ९ ) तेंच ब्रह्म स्वशक्तीनें स्थल ह्या शब्दानें सहा प्रकारचें झालें आहे. हे सहा प्रकार मोक्षाचे मुख्य मार्गच होत. ह्या मार्गांचा वीरमाहेश्वरांनीं ( जंगमांनीं ) फार आदर केला आहे. ( १० ) ह्या सहा मार्गांचीं स्वरूपें व नांवें थोडक्यांत तुला सांगतों. ह्या सहा मार्गांच्या ज्ञानापासून सहजच मुक्ति प्राप्त होते. ( ११ ) भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण, शिवलिंगैक्य, या प्रकारचीं तीं सहा स्थलें होत. (१२) श्रीशंकरांस प्रिय अशा भस्म रुद्राक्षादि चिन्हांचे ठायीं, दीनरक्षणाचे ठायीं व सदाचाराचे ठायीं ज्याची भक्ति असते तो भक्तस्थलांतील होय.

मुत्तमम् ॥ १३ ॥ परस्त्रियं परार्थं वा वर्जितो भावशुद्धिमान् ॥
लिंगनिष्ठानियुक्तात्मा माहेश्वरमहास्थलम् ॥ १४ ॥ लिंगा-
र्पितपदार्थस्य भोक्ता लिंगे समाहितः ॥ अनर्पितविवर्जी च
प्रसादिस्थलधीमतः ॥ १५ ॥ वायौ प्राणगुणे लिंगं लिंगे प्रा-
णः समाहितः ॥ सुखदुःखभयं नास्ति प्राणलिंगिस्थलंभवेत्
॥ १६ ॥ पतिर्लिंगं सतीचाहं हृदि युक्तः स्वयंप्रभुः ॥ प्रापञ्चिक
सुखं नास्ति शरणस्थलमुत्तमम् ॥ १७ ॥ षडूर्मयश्चषड्वर्गा ना-
स्ति चाष्टविधार्चनम् ॥ निर्भावो निजलिंगैक्यः शिखिकर्पूरयो-
गवत् ॥ १८ ॥ पूर्वं पूर्वं साधनं स्यात्साध्यं स्यादुत्तरोत्तरम् ॥
उत्तरोत्तरवैशिष्ट्यमेतेषां परिकीर्तितम् ॥ १९ ॥ अभ्यस्तं
पूर्वपूर्वं स्यादुत्तरोत्तरमाश्रयेत् ॥ आश्रित्य चोत्तरं मर्त्यः स्वयं पूर्वं

( १३ ) परस्त्री व परद्रव्य वर्ज्य करून लिंगाचे ठायीं जो शुद्ध प्रेम ठे-वितो तो माहेश्वरस्थलांतील आहे असें समजावें. ( १४ ) भक्ष्य व भोज्य पदार्थ लिंगास समर्पण करून जो भक्षण करितो आणि अर्पण न केलेले पदार्थांचा जो त्याग करितो तो प्रसादी स्थलांतील आहे असें समजावें. ( १५ ) प्राणरूप वायूचे ठिकाणीं लिंग व लिंगाचे ठिकाणीं प्राण ठेऊन सुख दुःख सारखें जो मानितो तो प्राणलिंगिस्थलांतील आहे असें समजावें. ( १६ ) धारण केलेले लिंग हाच पति व स्वयंप्रभु हृद-यस्थ आत्मा जो मी ती स्त्री, असा भाव धरून प्रपंचाचें सुख ज्यास नाहींसारखें असतें तो शरणस्थलांतील आहे असें समजावें. ( १७ ) क्षुधा, तहान, आशा, जनन, जरा, मरणादि षडूर्मी व कामक्रोधादि षड्रिपु ( सहा वैरी ) व जलगंधादि अक्षता वगैरे अष्टविध पूजन हेंही ज्याचे ठायीं नाहीं, भावही ज्याचे ठिकाणीं नाहीं आणि जो आपल्या लिंगाचे ठायीं, कापुराचें आणि ज्योतीचें जसें ऐक्य आहे त्याप्रमाणें एकमय झा-लेला असतो, त्यास ऐक्यस्थलांतील समजावें. ( १८ ) पहिलीं पहिलीं स्थलें साधनें आहेत, व पुढलीं पुढलीं साध्यें आहेत. ह्या स्थलांचा उत्त-रोत्तर विशेष गुण दिसून येतो. ह्मणजे पुढलीं पुढलीं स्थलें विशेष महा-त्म्याचीं व योग्यतेचीं आहेत. ( १९ ) पहिल्या स्थलाचा अभ्यास के-ल्यावर दुसरें स्थल स्वीकारावें व पुढल्याचा स्वीकार केला तर मागलें

परित्यजेत् ॥ २० ॥ एतान्यभ्यसतः पुंसो मुक्तिः पाणितले स्थिता ॥ न तस्य दुर्लभं किंचित्त्रिषु लोकेषु विद्यते ॥२१॥ षट्स्थलाभ्यासयोगेन मुक्तिः सायुज्यलक्षणा ॥ प्राप्यते शिवभक्तैश्च नान्यैः कर्मरतैर्जनैः ॥ २२ ॥ वृ० ॥ अतः सदाचाररतः समाधिमान् शिवस्य लिंगार्चनतत्परो जनः । शिवस्वरूपं परमार्थमादरात्सदाभ्यसेत्षट्स्थलमेकभावतः ॥ २३ ॥ ये षट्स्थलेषु विचरन्ति हि ते महान्तो वन्द्यास्त एव विजितेन्द्रियशत्रवस्ते ॥ सम्राड्स्वराडपिच यत्र तृणायते तच्छैवं पदं जगति ते समवाप्नुवन्ति ॥ २४ ॥ एवं षट्स्थलनिर्णयं शिवपदप्राप्त्यैकहेतुं सदा यः सेवेत कराब्जपीठनिहितः श्रीकण्ठलिंगार्चकः ॥ स ज्ञानी स पुरातनः स च महामाहेश्वरेषूत्तमो मर्त्यस्तेन जगत्त्रये न सदृशो विद्येत देवोऽपिवा ॥ २५ ॥ अतः समस्तं परिवर्जयित्वा सुखाभिलाषी परिपूर्णचेताः ॥ स्थलोक्तसम्यग्जितचित्तवृत्ति नि-

---

सोडून द्यावें. ( २० ) ह्या षट्स्थलांचा एकामागून एक असा अभ्यास केला तर मनुष्यास मोक्ष अगदीं करतलामलकवत सुलभ होतो. व त्यास ह्या त्रैलोक्यांत कांहींच दुर्लभ वस्तु राहात नाहीं. ( २१ ) ह्या षट्स्थलांचा अभ्यास केला तर शिवसायुज्यता मुक्ति प्राप्त होते. तशी मुक्ति इतर कर्मे करणाऱ्या जनांस प्राप्त होत नाहीं. ( २२ ) ह्मणून सदाचारयुक्त होत्साता मनुष्यानें शिवलिंगपूजा करावी. व परमश्रेष्ठ शिवस्वरूपाचें भक्तीनें चिंतन करावें. एकनिश्चयानें षट्स्थलांचा जे अभ्यास करितात त्यांनीं इंद्रियरूप शत्रु जिंकिले आहेत व ज्या शिवपदापुढें साम्राज्य किंवा स्वाराज्य ( स्वर्गलोकचें राज्य ) ह्यांची मुळींच प्रौढी नाहीं, असें तें शिवपद त्यांस ह्या जगतांत प्राप्त होतें. ( २३२४ ) शिवपदप्राप्तीला साधनीभूत असा हा षट्स्थलांचा निर्णय जो शंकरभक्त साध्य करून घेईल तोच ज्ञानी, तोच श्रेष्ठ व सर्व जंगमांत तोच वरिष्ठ व त्याची बरोबरी करणारा ह्या जगत्त्रयावर कोणी देवसुद्धां मिळणार नाहीं; मग मनुष्य कोठचा मिळणार ? ( २५ ) ह्मणून यापुढें चिरकाळ सुखाची आशा करणाऱ्या मनुष्यानें पूर्ण निश्चयानें षट्स्थलांत सांगितल्याप्रमाणें आपल्या

वेश्य तद्भावविचारवान् स्यात् ॥ २६ ॥ एतदप्यपरे प्राहुः षट्-स्थलज्ञानवित्तमाः ॥ भक्त्यादिज्ञानपर्यन्तं साध्यसाधनभावतः ॥ २७ ॥ भक्तिः कर्मक्षयो बुद्धिर्विचारो दर्पसंक्षयः ॥ सम्यग्ज्ञान-मिति प्राज्ञैः स्थलषट्कमुदाहृतम् ॥ २८ ॥ क्रिययोत्तमया भक्तिः प्राप्यते शिवचिन्तकैः ॥ भक्त्या कर्मक्षयस्तस्मादमला धिषणा भवेत् ॥ २९ ॥ धिया वस्तुविचारः स्याद्विचाराद्दर्पसंक्षयः ॥ त-स्मादज्ञानं ततो मोक्षो न मोक्षाद्विद्यते परम् ॥ ३० ॥ यस्यैवं क्रमविज्ञानं देशिकस्य प्रसादतः ॥ जन्मान्तरकृतात्पुण्याज्जायतेऽसौ सदाशिवः ॥ ३१ ॥ सम्यग्ज्ञानस्य मूलं हि भक्तिरव्यभि-

---

चित्तवृत्ति स्वाधीन करून ध्याव्यात. षट्स्थलांत सांगितलेल्या अवस्थांचें पूर्ण चिंतन करीत असावें. ( २६ ) षट्स्थलांचें पूर्णज्ञान असलेल्या दुसऱ्या विद्वान लोकांचें मत आहे कीं, भक्तीपासून ज्ञानापर्यंत षट्स्थलें ह्मणजे सहा पायऱ्याच जणूं आहेत, व एक स्थल दुसऱ्यास साधन आहे आणि दुसऱ्या स्थलाचें तिसरें स्थल साध्य ( अभ्यासानें प्राप्त करून घे-ण्याचें स्थान ) आहे. ( २७ ) दुसऱ्या ज्ञात्यांनीं जीं निराळीं षट्स्थलें मानलेलीं आहेत, तीं भक्ति, कर्मक्षय, बुद्धि, विचार, दर्पसंक्षय व सम्यग्ज्ञान हीं होत. ( २८ ) शिवभक्तांना उत्तम भक्ति जी प्राप्त होते ती लिंगपू-जादि क्रियांच्या योगानेंच होय. व भक्ति प्राप्त झाली ह्मणजे ह्या जन्मांतील अगर पूर्व जन्मांतील, गोवत्साप्रमाणें पाठीस लागलेलीं कर्में, नाश पावतात. आणि कर्मक्षय झाला ह्मणजे बुद्धि शुद्ध होते. ( २९ ) बुद्धि शुद्ध झाली ह्मणजे ब्रह्मसन्मात्र वस्तु ह्मणजे काय याचा निश्चय होतो. व विचार सुरू होतो. विचार सुरू झाला ह्मणजे गर्वाचा किंवा अहंपणाचा ताठा मोडतो. आणि गर्व नाहींसा झाला ह्मणजे ज्ञान मिळतें. आणि ज्ञानापा-सून मोक्ष मिळतो. या मोक्षाची पायरी सर्वांहून वरिष्ठ आहे. ह्या मोक्षा-पेक्षां श्रेष्ठ वस्तु या जगत्त्रयांतसुद्धां नाहीं. ( ३० ) देशिकाच्या प्रसादा-नें या प्रकारचें ज्ञान क्रमाक्रमानें प्राप्त झाल्यानें व पूर्वजन्मार्जित पुण्याईनें शिष्य शिवरूप होतो. ( ३१ ) अनन्यभक्ति उत्पन्न होणें ही सम्यग्ज्ञान

चारिणी ॥ सच्चिदानंदसंपूर्णे शिवलिंगस्वरूपिणि ॥ ३२ ॥ शिवस्य भक्तिमूलं हि वीरमाहेश्वरैर्जनैः ॥ संगमः सर्वदा पुंसां स तु लोकेषु दुर्लभः ॥ ३३ ॥ पुराकृतमहापुण्यपरिपाकवशेन च ॥ वीरमाहेश्वरैः संगः सुलभः कस्यचिद्भवेत् ॥ ३४ ॥ नरो माहेश्वरैः संगपरो भवति यद्दिने ॥ तद्दिनेनैव नो मासैःप्राप्नोति शिववेदनम् ॥ ३५ ॥ यो हस्तपीठे निजलिंगमिष्टं विन्यस्य तल्लीनमनःप्रचारः ॥ बाह्यक्रियासंकुलनिस्पृहात्मा संपूजयत्यंग स वीरशैवः ॥ ३६ ॥ गुरुप्रसादाधिगतेष्टलिंगं सम्पूजयन्तं स्वकराब्जपीठे ॥ षडास्य भक्त्या विविधोपचारैर्नरस्तमालोक्य विमुक्तिमेति ॥ ३७ ॥ न वीरमाहेश्वरसेवया विना शिवस्य भक्तिर्मनुजैर्न लभ्यते ॥ विनास्तिभक्त्या शिववेदनं न हि प्रधानमेतच्छिवभक्तपूजनम् ॥ ३८ ॥ भवा-

---

प्राप्त झाल्याची खूण आहे. ह्मणजे सत्यज्ञानापासून सच्चिदानंदरूप शिवलिंगाचे ठायीं अनन्यभक्ति उत्पन्न होते. ( ३२ ) जगत्त्रयांत दुर्मिळ अशी जंगमांशीं संगति घडण्यास शिवभक्ति हेंच कारण आहे. ( ३३ ) तथापि कोणाकोणास जंगमांशीं संगति सहज घडते. याचें कारण पूर्वजन्माच्या सत्कर्मांचा परिणाम हेंच होय. अन्यथा वीरमाहेश्वरांची ( जंगमांची ) संगति सहज घडणार नाहीं. ( ३४ ) मनुष्यास वीरमाहेश्वरांचा ( जंगमांचा ) संग एकदां प्राप्त झाला तर त्या दिवशींच शिवज्ञान त्यास प्राप्त होतें. मग शिवज्ञान प्राप्त होण्यास महिने महिने वाट पाहात बसावें लागत नाहीं. ( ३५ ) जो इष्ट शिवलिंग हस्तकमलावर धारण करून त्या लिंगाचे ठायीं आपलें मन एकाग्र करितो व बाहेरच्या सर्व व्यापारांकडे दुर्लक्ष्य करितो व अशा रितीनें शिवलिंगाची पूजा करितो,तोच खरा वीरशैव समजावा.( ३६ )गुरुप्रसादानें इष्टलिंग प्राप्त झाल्यावर तें आपल्या हस्तकमलावर ठेवून त्या लिंगाची नाना उपचारांनीं, षडाननानें (षण्मुखानें ) केलेल्या भक्तीप्रमाणें जा भक्तियुक्त पूजा करितो त्याच्या दर्शनानेंच इतर मनुष्यांस मोक्ष प्राप्त होतो. ( ३७ ) वीरमाहेश्वरांची ( जंगमांची ) सेवा केल्याशिवाय शिवाचे ठायीं भक्ति प्राप्त होत नाहीं. व शिवभक्तीविणें शिवज्ञान प्राप्त होत नाहीं. ह्मणून शिवज्ञान प्राप्त होण्यास शिवभक्तांची पूजा हेंच मुख्य साधन होय. ( ३८ )

र्णवं तर्तुमिहेच्छतां नृणामुपायएकः सुलभः सुखप्रदः॥ न वीरमाहेश्वर-संगमादृते जगत्त्रये नास्ति विचारिते सति ॥३९॥ माहेश्वरस्यहृद-यांबुजकर्णिकाया मध्ये वसामि गिरिराजसुतासहायः ॥ तं पूजयेद्य इह मां मनुजोऽर्चयेद्यस्तस्मै ददामि शिखिवाहन वांछितार्थम् ॥ ४० ॥ या पूजा मम भक्तस्य कृता येन षडानन ॥ सा ममैव कृ-ता पूजा तेन नास्त्यत्र संशयः ॥ ४१ ॥ मल्लिंगं मस्तकाद्यङ्गे धृत्वा शक्रपुरोगमाः ॥ देवं मां लिंगमध्यस्थं संपूज्य स्वं पदं ययुः॥४२॥उरः स्थले हारिर्लिंगं धृत्वा शक्रपुरोगमाः॥ लिंगस्थं मां समाराध्य स्वं स्वं पदमवापिरे ॥ ४३ ॥ लक्ष्मीसरस्वतीमुख्या देव्यो मल्लिंगमादरात् ॥ धृत्वा निजाङ्गे तल्लीनभावा जग्मुः परं सुखम् ॥ ४४ ॥ ॥ वृ० ॥ केचिन्महान्तो हृदि भावलिंगं संपूज्य सच्चित्सुखरूपमीशम् ॥ मुक्तिं प्रयाताः परमात्मलीनमनःप्रचाराः परिपूर्णभावाः ॥ ४५ ॥ प्राणाव्हयं लिंगमनन्यभावाः संपूजयि-

---

भवसमुद्र तरून जाण्यास उपाय कोणता, असा जर कोणास प्रश्न उत्पन्न होईल तर वीरमाहेश्वरांच्या ( जंगमांच्या ) संगतीशिवाय दुसरा सुलभ उपाय या त्रैलोक्यांत सांपडणार नाहीं. ( ३९ ) पार्वतीसहवर्तमान मी जंगमांच्या हृदयमंदिरांत नेहमीं वास करितों. हे षण्मुखा, माझें निवा-सस्थान असा जो हा जंगम त्याची, अर्थात् माझी, जो पूजा करील त्याचे सर्व मनोरथ मीं पूर्ण करितों. ( ४० )यावरून हे षण्मुखा, माझ्या भक्ता-ची जी पूजा होते ती माझीच पूजा होय, यांत तिळमात्र संदेह नाहीं. ( ४१ ) इंद्रादि देवगण माझें आत्मलिंग मस्तकादिकांचे ठायीं धारण करून लिंगस्थ जो मी त्या माझी पूजा केल्यानें त्यांना आपापलीं स्थानें प्राप्त झालीं. ( ४२ ) त्याच प्रमाणें छातीवर लिंग धारण करून लिंगस्थ माझ्या रूपाची पूजा करून श्रीहरिही आपल्या पदाला प्राप्त झाले. ( ४३ ) त्याचप्रमाणें सरस्वती लक्ष्मी आदिकरून देवींनीं माझें लिंग प्रेमानें धारण केलें, व त्यायोगानें त्या देवी परम सुखाप्रत प्राप्त झाल्या. ( ४४ ) कांहीं महात्मे लोकांनीं हृदयांत सच्चिदानंदात्मक भावलिंगाची पूजा करून व पूर्ण भाव प्राप्त करून घेऊन ते मोक्षपदाला गेले. (४५)

त्वा गुह नाभिकण्ठे ॥ केचिन्मुनीन्द्राः पदमव्ययं तच्छिवं प्रयाता दृढभक्तियुक्ताः ॥ ४६ ॥ अन्ये सदा योगपरा हृदब्जज्वलन्तमंगुष्ठमितं पुराणम् ॥ लिंगस्वरूपं शिवमप्रमेयं संभाव्य तस्मिन्लयमापुरार्याः ॥४७॥ भ्रूघ्राणमध्येऽप्यविमुक्तदेशे विश्वेश्वराख्यं परमात्मलिंगम् ॥ ध्यानामृतासक्तधियो महान्तो ध्यात्वा परां मुक्तिमवापुरन्ये ॥ ४८ ॥ ये ब्रह्मरन्ध्रस्थसहस्रपत्रमध्ये स्फुरन्तं रविकोटिभासम् ॥ मामेकभावेन विभावयन्ति ते मे प्रिया नित्यविमुक्तिभाजः ॥ ४९ ॥ ये वै पृथक्त्वेन समर्चयन्ते मामद्वयं ते पृथगेव मत्तः ॥ ते नो मदीया भवपाशबद्धास्संसारदीर्घाध्वनि नैगमास्ते ॥ ५० ॥ हे वत्स लिंगांगपदं विशोध्य तस्मिन्नथान्योन्यविशुद्धभावः ॥ हित्वा विरुद्धप्रतिपत्स्वरूपमात्मेति संबंधप-

---

कांहीं महात्मे लोकांनीं नाभीजवळील कमलांत अगर कंठाजवळील कमलांत सच्चित्सुखात्मक मानसलिंगाचें ध्यान करून आपले सर्व व्यापार परमात्मरूपांत लीन करून मोक्ष प्राप्त करून घेतला. ( ४६ ) व इतर योगी लोक हृदयांत प्रकाशित असलेल्या अंगुष्ठमात्र पुरुषाच्या रूपास शिवरूप लिंगच समजून त्याचे ठायीं आपलें मन एकाग्र करितात. ( ४७ ) नाक आणि भुवया यांमधील प्रदेशाला अविमुक्त प्रदेश ह्मणतात. त्या ठिकाणीं कांहीं योग्यांनीं विश्वेश्वर या नांवाच्या परमात्म शिवलिंगाचें ध्यानरूपी अमृत प्राशन करून मोक्ष प्राप्त करून घेतला. जे ( ४८ ) योगी लोक ब्रह्मरंध्रांत ( कपाळावरील टाळूंत ) असलेल्या हजार पाकळ्यांच्या कमळांत कोटिसूर्याचे तेजाप्रमाणें प्रकाशमान होणारें जें माझें रूप त्याचें अनन्यभक्तीनें ध्यान करितात ते नित्यमुक्त आहेत व ते मला फारच प्रिय आहेत. ( ४९ ) तसेंच जे वेदमार्गानिरत लोक, मी व ते भिन्न आहोंत असें समजून माझी द्वैतभक्ति करितात ते मजपासून भिन्न आहेत व त्यांस मी माझे असें ह्मणत नाहीं, व त्यांची संसारबंधनापासून मुक्तता होत नाहीं, व ते या भवरूपी लांब मार्गांतून बाहेर पडतच नाहींत. (५०) करितां हे बालका स्कंदा लिंग आणि अंग या दोन पदांचें विशेष ज्ञान प्राप्त करून घेऊन त्या दोन पदांतील शुद्ध स्थिति समजून घ्यावी व त्या दोन पदांतील परस्पर-विरुद्ध भावाचा त्याग करावा ह्मणजे

दार्थ एषः ॥ ९१ ॥ एवं हि लिंगाङ्गपदार्थसंविद्येषां दृढाभ्यासवशादिहास्ति ॥ ते मामुपेष्यन्ति विशुद्धभावा नावर्तयन्तिस्म पुनर्भवाय ॥ ९२ ॥ तस्मादिह प्राणशिवैक्यभाजं संपूजयेद्यो भुवनैकवन्द्यम् ॥ संसारसंवन्धविलीनभावः स ज्ञानमेति स्थलषट्कजं तत् ॥ ९३ ॥ तवाथवा षट्स्थलमन्यदस्ति शिवाङ्गभूतं श्रुतितंत्रसिद्धम् ॥ परं पदं शुद्धमनंतरूपं वदाम्यहं गुह्यतमं स्ववेद्यम् ॥ सर्वज्ञतादीनि निसर्गभूतान्यंगानि तत्षट्स्थलमाहुरार्याः ॥ अंगीकृतत्वाद्गिरिशेन नित्यं वक्ष्यामि ते तानि मम प्रियाणि ॥ ९५ ॥ सर्वज्ञतातृप्तिरनादिवोधः स्वतंत्रता नित्यमलुप्तशक्तिः ॥ अनन्तशक्तिश्च विभोर्विधिज्ञाः षडाहुरंगान्यथ षट्स्थलानि ॥९६॥ सर्वज्ञतादिस्थलषट्कजाता संविद्यथाभ्यासवशाद्विभाति ॥ येषां गुरूक्त्या मम भक्तियोगाद्युक्तानुभूत्या त इहैव मुक्ताः ॥ ९७ ॥

---

आपल्या सत्य स्वरूपाचें ज्ञान होतें. ( ९१ ) याप्रमाणें लिंगांग पदांचें ज्ञान सतत अभ्यासानें ज्यास प्राप्त होतें ते शुद्ध स्वरूप होऊन माझ्या रूपाला प्राप्त होतात. व पुनर्जन्माचे फेरे त्यांस फिरावे लागत नाहींत. ( ९२ ) ह्मणून ह्या जगतीतलावर प्राणशिवैक्य ज्यांनीं केलें आहे तेच वंदन करण्यास योग्य आहेत. त्याची जे पूजा करितील त्यांची संसारावद्दल भीति नाहींशी होईल आणि त्यांस षट्स्थलांचें पूर्णज्ञान प्राप्त होईल. ( ९३ ) श्रुति तंत्रें वगैरे ग्रंथांत षट्स्थलांचें निराळ्या प्रकारचें वर्णन आढळून येतें. फारच हें गुप्त आहे व ह्यांचे ( षट्स्थलांच्या ) ज्ञानाची प्रचीती आपोआप होते. ( ९४ ) स्वाभावसिद्ध सर्वज्ञतादि जीं षट्स्थलें श्रुत्यादि ग्रंथांत वर्णन केलेलीं आहेत तीं श्री गिरिशांनीं स्वीकारिलेलीं आहेत ह्मणून तीं मला प्रिय आहेत. ( ९५ ) सर्वज्ञता, तृप्ति, सर्वकाल टिकणारें ज्ञान, स्वातंत्र्य, कधींही नाहींशी न होणारी शक्ति, अनंत शक्ति, अशीं षट्स्थलें श्रीशंकरांचीं अंगभूत आहेत असें सूज्ञ लोक ह्मणतात. ( ९६ ) सर्वज्ञतादि षट्स्थलांचें ज्ञान अभ्यासापासून प्राप्त होतें. व ज्यांस गुरूपदेशापासून व माझ्या भक्तीपासून व अनुभवानें हें ज्ञान प्राप्त होतें तेच इहलोकीं मुक्त होत.

तस्मात्परब्रह्मसुखस्वरूपं स्वमायया षट्स्थलभेदभिन्नम् ॥ सच्चिन्मयं शंकरमक्षरं तद्यो वेद नायाति पुनर्भवं सः ॥ ५८ ॥ एवं षट्स्थलविज्ञानं प्रत्यग्रूपं प्रमाणतः ॥ गुरूक्त्या स्वानुभूत्या च यस्य भाति स सर्ववित् ॥ ५९ ॥ सुदुर्लभमिदं ज्ञानं नराणामुत्तमोत्तमम् ॥ मद्भक्तिरहितानां च दुर्वृत्तानां षडानन ॥ ६० ॥ तद्भावामृततृप्तानां तदाचारानुवर्तिनाम् ॥ जायते परमज्ञानं स्थलषट्कोद्भवं नृणाम् ॥ ६१ ॥ यस्यैवं षट्स्थलज्ञानसामग्रीकलना दृढा ॥ भाति धीदर्पणे स्वच्छे स वै माहेश्वरो जनः ॥ ६२ ॥ स भवार्णवमत्युग्रं दुष्पारं दुस्तरंगकम् ॥ तीर्त्वा मां परमात्मानमेति नावर्तते पुनः ॥ ६३ ॥ तस्य माहेश्वरस्यैषा निष्ठा वक्तुं न शक्यते ॥ मया सर्वविदा वत्स किमुतान्यैरजादिभिः ॥ ६४ ॥

---

(५७)करितां परब्रह्मस्वरूपच आपल्या मायेच्या योगानें सहा प्रकारचें भासतें. तेव्हां असें भिन्नरूपानें दृग्गोचर (दिसणारें) होणारें व सर्वकाल टिकणारें श्रीशंकरांचें स्वरूप जो जाणतो त्याला पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं.( ५८) याप्रमाणें षट्स्थलांचें ज्ञान प्रमाणांनीं, सिद्धान्तांनीं, गुरूपदेशानें व स्वानुभवानें ज्यांस प्राप्त झालें आहे ते सर्वज्ञच होत.(५९)हे षडानना,(हे षण्मुखा) ज्यांची माझे ठायीं भक्ति नाहीं त्यांस हें सर्वोत्तम ज्ञान प्राप्त होण्यास फार दुष्कर आहे. ( ६० ) ह्या षट्स्थलज्ञानापासून प्राप्त होणाऱ्या आनंदानें जे संतुष्ट होतात व षट्स्थलांत सांगितल्याप्रमाणें आचरण करितात त्यांस षट्स्थलांसंबंधीं उत्तमोत्तम ज्ञान प्राप्त होतें. ( ६१ ) ज्याची बुद्धि षट्स्थलांचें ज्ञान संपादन केल्यानें, स्वच्छ आरशांत दिसणाऱ्या प्रतिबिंबाप्रमाणें, स्वच्छ झालेली असते व दृढ झालेली असते तोच खरा खरा माहेश्वर जन होय. ( ६२ ) तोच मनुष्य अति दुस्तर व भयंकर अशा संसारसमुद्रांतून तरून जाऊन माझ्या परमात्म रूपाला प्राप्त होतो, व त्यास पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं. ( ६३ ) वत्सा (मुला) षडानना ( षण्मुखा ) त्याची माझ्या ठायीं जी भक्ति आहे ती मला सुद्धां वर्णन करितां येत नाहीं, तर मग ब्रह्मदेवादि देवांस ती कशी वर्णन करितां येईल ? ( ६४ ) याकरितां इतर सर्व साधनांचा त्याग करून

तस्मात्सर्वं परित्यज्य वीरमाहेश्वरं जनं ॥ पूजयेदादराद्यस्तु स स्म्यग्ज्ञानवान् भवेत् ॥ ६५ ॥संसारसागरे गाधे दुःखावर्तशताकुले ॥ मज्जतां मनुजानां वै पूजा माहेश्वरस्य नौः ॥ ६६ धृतलिंगं सदाचारनिरतं द्विजपुंगवम् ॥ वीरमाहेश्वरं सम्यक् पूजयेद्भक्तिमान्नरः ॥ ६७ ॥ पूजिते सति मद्भक्ते मनुजैर्भक्तिसंयुतैः ॥ पूजिताः सकला देवा भवेयुर्नोऽत्र संशयः ॥ ६८ ॥ मद्भक्तहृदयांभोजे सदा तिष्ठामि षण्मुख ॥ यत्र तिष्ठाम्यहं नित्यं तत्र मत्संभवाः सुराः ॥ ६९ ॥ तिष्ठन्तो भक्तिनम्रास्ते मत्पूजासक्तमानसाः ॥ तस्मिन्संपूजिते मर्त्यैः सर्वे देवाःसुपूजिताः ॥७०॥ क्रिमिकीटपतंगेभ्यः पशवः मज्ञयाधिकाः ॥ पशुभ्योऽपि नराः श्रेष्ठास्तेषु श्रेष्ठा द्विजातयः ॥ ७१ ॥ द्विजातिष्वधिका विप्रा वि-

---

वीरमाहेश्वरांची ( जंगमांची ) जो मनोभावें पूजा करील त्याला सत्यज्ञान प्राप्त होईल. ह्मणजे परमेश्वराचें सत्यस्वरूप त्यास समजेल. ( ६५ ) अति खोल असून ज्यांत नाना दुःखरूपी भोंवरे आहेत अशा ह्या संसार समुद्रांत बुडत असतां माहेश्वरांची ( जंगमांची ) पूजा हीच एक नौका आहे. ( ६६ ) सदाचरणानें वागणारा व लिंग धारण करणारा असा वीरमाहेश्वर ( जंगम ) ब्राह्मण श्रेष्ठ पाहून त्याची भक्तिभावानें पूजा करावी. ( ६७ ) भक्तियुक्त अंतःकरणानें माझ्या भक्तांची जे पूजा करितील त्यांस इतर सर्व देवांचीही पूजा घडली असें समजावें. यांत कांहीं शंका धरण्याचें कारण नाहीं. ( ६८ ) हे षण्मुखा, माझ्या भक्तांच्या हृदयकमळांत मी सदा वास करितों. व ज्या ठिकाणीं मी नेहमीं वास करितों त्या ठिकाणीं मजपासून उत्पन्न झालेले सर्व देवही वास्तव्य करितात ( राहतात ). ( ६९ ) इतर देव मद्भक्ताच्या हृदयकमळांत भक्तिपूर्वक राहतात व नम्र होऊन माझी तेथें पूजा करितात. करितां मद्भक्त वीरमाहेश्वरांची ( जंगमांची ) पूजा केली असतां सर्व देवांची पूजा केल्याचें श्रेय येतें. ( ७० ) क्रिमी कीटक पतंगादि प्राण्यांपेक्षां पशु, बुद्धीनें अधिक बुद्धिवान् असतात. पशूंपेक्षां मनुष्य जाति अधिक बुद्धिवान् व मनुष्य जातींत ( ७१ ) द्विजजाति अधीक, द्विजांपेक्षां विप्र, विप्रांपेक्षां

प्रेषु क्रतुबुद्धयः ॥ क्रतुबुद्धिषु कर्तारस्तेभ्यः सन्यासिनोऽधिकाः॥ ७२ ॥ तेभ्यो विज्ञानिनः श्रेष्ठास्तेषु शंकरपूजकाः ॥ तेषु श्रेष्ठा महाभाग ममलिंगाङ्गसंगिनः ॥ ७३ ॥ लिंगाङ्गसंगिष्वधिकः षट्स्थलज्ञानवान्पुमान् ॥ तस्मादप्यधिको नास्ति त्रिषु लोकेषु सर्वदा ॥ ७४ ॥ स वन्द्यः सर्वदा पूज्यः संसारविजिगीषुभिः ॥ बहुनोक्तेन किं वत्स स एवाहं न संशयः ॥ ७५ ॥ सर्वमुक्तं समासेन स्थलनिर्णयवेदनं ॥ गोप्यं समस्तशास्त्रेषु तव स्नेहान्मयोदितम् ॥ ७६ ॥ अस्मिन्नर्थे स्वयं वेदाः श्रुतयः सकलागमाः ॥ पुराणानि समस्तानि पर्यवस्यन्ति युक्तयः ॥ ७७ ॥ बहुनोक्तेन किं वत्स सार एष मयोदितः ॥ तस्मादेवं विदित्वा तु षट्स्थलज्ञानवान् भव ॥ ७८ ॥ ॥ वृ० ॥ सकल निगमसारं षट्स्थलं ज्ञानमेतद्भवविपिनकुठारं सर्वतंत्रप्रसिद्धम् ॥

---

यज्ञ करण्याची इच्छा असणारे, यज्ञ करण्याची इच्छा असणाऱ्यांपेक्षां यज्ञ करणारे, यज्ञ करणाऱ्यापेक्षां कर्म सन्यास ( कर्माचा त्याग ) करणारे, कर्म त्याग करणाऱ्यांपेक्षां, ( ७२ ) ज्ञानवान्, ज्ञान्यांपेक्षां श्रीशंकरांची पूजा करणारे, शंकरपूजकांपेक्षां, लिंग धारण करणारे, लिंगधारकांपेक्षां ( ७३ ) षट्स्थलांचें ज्ञान असलेले लोक वरिष्ठ असतात. ह्या षट्स्थलांचें ज्ञान असणाऱ्यांपेक्षां या त्रैलोक्यांत कोणीही वरिष्ठ नाहीं. ( ७४ ) संसारसागरापासून तरून जाणाऱ्यांनीं नेहमीं अशा षट्स्थलज्ञान्याची पूजा करावी. व सर्वांस तो वन्द्यच होय. अधिक काय सांगावें, हे वत्सा, मी तोच आहे असें समज; यांत संदेह बिलकूल नाहीं. ( ७५ ) षट्स्थलाचें थोडक्यांत ज्ञान व्हावें ह्मणून थोडक्यांत सर्व सांगितलें आहे. ( ७६ ) वर लिहिलेल्या वर्णनास व माहितीला वेद, श्रुति, सर्व आगम, पुराणें, यांचें अनुमोदन आहे व सर्व प्रकारच्या युक्तिवादांचा शेवट वर लिहिलेल्या अर्थाप्रमाणेंच होतो. ( ७७ ) फार काय सांगावें, हे वत्सा, सर्व आगम पुराणादिकांचें हें सारच आहे. ह्मणून याचें ज्ञान संपादन करून घेऊन षट्स्थलांचा परिचय करून घे. ( ७८ ) हें षट्स्थलांचें ज्ञान सर्व वेदांताचें सारभूतच आहे. त्याचप्रमाणें हें ज्ञान भवरूपी अरण्यास

परमसुखसरूपावाप्तिहेतूत्तमाख्यं तव कथितमशेषं त्वं सदा प्रेमभूमिः ॥ ७९ ॥ त्वमपि कथय धर्मं भक्तियुक्ताय सर्वं विजितमदनरागद्वेषलोभेंद्रियाय । गुणगणनिलयाय प्राणलिंगैक्यभाजे गुरुचरणसरोजध्यानयुक्ताय वत्स ॥ ८० ॥ अशिष्टायाविरक्ताय देवतादूषकाय च । लिंगधारणदूराय मा वादीस्त्वं कदाचन ॥८१॥

सूत उवाच

इत्युक्त्वा शंकरः क्रौंचदारणायामितौजसे ॥ गौरीमुखाब्जविन्यस्तदृष्टिष्तूष्णीं बभूव सः॥ ८२ ॥श्रुत्वा शिवमुखोद्गीतं स्कन्दः षट्स्थलनिर्णयं॥ प्रणम्य दण्डवद्भूमौ भक्त्या परवशो गुहः॥ ८३ ॥ भक्त्या परवशोभूत्वा कंचित्कालं महेश्वरे॥ लब्धसंज्ञो महादेवं स्कन्दस्तुष्टाव शंकरम् ॥ ८४ ॥

॥ स्कन्द उवाच ॥

नमःशिवाय सोमाय षट्स्थलब्रह्मरूपिणे ॥ सदानंदस्वरूपाय

---

कुऱ्हाडीप्रमाणें नाशकारक आहे. व सर्व तंत्र ग्रंथांत याची प्रसिद्धी आहे. तुझ्यावर माझें अतिशय प्रेम आहे करितां सर्व सुखांस प्राप्त करून देणार हें ज्ञान तुजला मीं सर्व सांगितलें आहे ( ७९ ) हे वत्सा षडानना तूं हें गोप्य गुणवान असून गुरुचरणावर निष्ठा ठेवणाऱ्याला व कामक्रोधादि षड्रिपु ज्यानें जिंकले आहेत अशा भक्तिमान् मनुष्यालाच सांग ( ८० ) त्याच प्रमाणें अज्ञानी विषयलंपट, व देवतांची निंदा करणारे व लिंगधारण न करणारे अशा लोकांस तूं हें गोप्य मुळींच सांगू नको. ( ८१ ) सूत सांगतात शौनकादि ऋषिहो श्री शंकर वरलिहिल्या प्रमाणें उपदेश केल्या नंतर श्री भवानी देवीच्या मुखाकडे पहात स्तब्ध राहिलें. ( ८२ ) श्री शंभु मुखांतून वरील प्रमाणें षट्स्थलांची माहिती ऐकून षडानन दण्डाप्रमाणें भुमीवर साष्टांग नमस्कार करून ८३ परम भक्तीनें कांहीं कालपर्यंत ध्यानस्थ झाले. नंतर शंकरांनीं शुद्धिवर आणल्यावर प्रेमपूर्वक ते षण्मुख श्री शंकराची स्तुति करूं लागले. ( ८४ ) षट्स्थलरूपी शंकराला, योग्य ज्ञान देणाऱ्या महेश्वराला सदानंदरूप महादेवाला, ) ८५ ) निल-

सम्यग्ज्ञानप्रदायिने ॥ ८५ ॥ नीलकण्ठाय नित्याय निर्विकाराय शंभवे ॥ निरंजनाय शर्वाय त्र्यंबकाय नमो नमः ॥ ८६ ॥ गंगाधरं विरूपाक्षं चंद्रलेखावतंसकम् ॥ सर्वज्ञं सर्वगं सर्वं वन्दे सर्वाश्रयं शिवम् ॥ ८७॥ आधारं सर्वलोकानामनाधारमविक्रियम्॥ निस्तरंगसुखांभोधिं नमामीशानमव्ययम् ॥ ८८ ॥ कलाधारं कलातीतं कालकालं कपर्दिनम् ॥ कर्मादिरहितं शुद्धं वन्दे भूतेशमक्षरं ॥ ८९ ॥ ब्रह्मविष्णुसुरेशानां कारणं कारणातिगम् ॥ नागालंकृतसर्वांगं नमामि सकलेश्वरम् ॥ ९० ॥ निष्कलं निर्मलं सच्चिन्मयं संसारमोचकम् ॥ साम्बं सर्वात्मकं वन्दे सदाशिवमनीश्वरम् ॥ ९१ ॥ अव्यक्तं व्यक्तसद्भावं कारणं कृत्तिवाससम् ॥ कल्याणमादिपुरुषं नमामि गिरिजाधवम्॥९२ गीर्वाणार्चितपादाब्जं गीतताण्डवमण्डितम् ॥ गिरिशं गीष्पतिं-

---

कंठ व निर्विकार शंभूला निरंजन त्र्यंबकाला मी नमस्कार करितों. (८६) गंगाधर, सर्वज्ञ, सर्वांस आधारभूत, विरूपाक्ष, व चंद्रास अलंकाराप्रमाणें मस्तकावर धारण करणारे, ( ८७ ) सर्व लोकांस आधारभूत असूनही अनाधार, आणि अक्रियरूपात्मक व सुखसमुद्र श्री शंकरांनां मी नमस्कार करितों. ( ८८ ) कलाधार असूनही कलांचें न्यूनाधिक्य ज्यांचे स्वरूपांत दिसत नाहीं, व कालाचेही काल असून कर्मादिकांची ज्यांस बाधा होत नाहीं अशा शुद्धरूप भूताधिपतीनां मी नमस्कार करितों. ( ८९ ) ब्रह्मा, विष्णु, इंद्रादि देवांचें आदिकारण असणाऱ्या सदाशिवाला व ज्यांचे ठायीं कारण व कार्य यांची उपाधि नाहीं व ज्यांनीं सर्वांगावर सर्पाचीं भूषणें धारण केलीं आहेत अशा सकलेश्वराला व संसारपाशनाशकाला (९०) व निर्मल शंकराला मी वंदन करितों. व संसारपाश नाहींसा करणाऱ्या सच्चिन्मय सर्वात्मक शंकराला व ज्या सदाशिवाला नियन्ता नाहीं अशा सदाशिवाला मी नमस्कार करितों. ( ९१ ) चर्मवस्त्रें धारण करणाऱ्या सदाशिवाला व अव्यक्त असून व्यक्त ( दृश्य ) झालेल्या शंकराला व आदि पुरुष गिरिजापतीला व ( ९२ ) गीत आणि नृत्य ज्यांस अवगत

स्तुत्यं वंदेऽहं सर्वसाक्षिणम् ॥ ९३ ॥ उमाकुचाब्जलावण्यमधु-
मत्तेक्षणालये ॥ नमो विश्वात्मने तुभ्यं स्वभावामलतेजसे ॥ ९४
यस्य प्रसादाद्योगीन्द्रा ज्ञानवन्तः परं ययुः ॥ तं त्वां प्रपद्ये दे
वेश सर्वमंगलकारणम् ॥ ९५ ॥ यस्माच्चराचरं विश्वं जायते यत्र
तिष्ठति ॥ लीयते यत्र सततं तं प्रपद्ये महेश्वरम् ॥ ९६ ॥ त्व
त्प्रसादाज्जगन्नाथ ज्ञातं सर्वं मयाऽधुना ॥ शैवसिद्धान्तसर्व-
स्वं षट्स्थलब्रह्मवेदनम् ॥ ९७ ॥ त्वत्स्वरूपपरिज्ञानादासं स-
म्पूर्णवेदनः ॥ तस्मात्सर्वं परित्यज्य त्वामहं शरणं गतः ॥९८॥

॥ सूत उवाच ॥

स्तुत्वेति शंकरमजं करुणालयं तं संसारमोचकमखंडसुखस्व-
रूपम् ॥ स्कन्दोऽम्बिकाधवपदाम्बुजभक्तिभावादानंदनिर्भरम-
नाः समवैन्निजं तं ॥ ९९ ॥ युष्माकमद्य कथितः श्रुतितंत्र-
गोप्यो मुक्त्यंगनोद्वहनसंघटनापटीयान् ॥ सारश्च षट्स्थल-
विनिर्णय एष लोके नान्योऽस्त्यतः परतरो भवबंधशान्त्यै

---

आहे अशा शंकरांना व सर्वसाक्षी ( ९३ ) उमावराला व स्वभावतः ज्याचें तेज स्फटिकाप्रमाणें शुभ्र आहे अशा शंकराला व ( ९४ ) ज्याच्या प्रसादानें ज्ञानवान् लोक मोक्ष पदाला गेले व ( ९५ ) ज्या विश्वेश्वरापासून चराचर विश्व उत्पन्न होऊन त्याच्याच रूपांत तें वृद्धिंगत पावतें व लयही पावतें अशा महेश्वराला मी नमस्कार करितों. ( ९६ ) हे जगन्नाथ, तुझ्या प्रसादानें मला आतां षट्स्थल ब्रह्माबद्दल सर्व ज्ञान झालें व सर्व शैव सिद्धान्ताचेंही ज्ञान झालें. ( ९७ ) आणि ह्या षट्स्थलस्वरूपाच्या ज्ञानापासून मी सर्वज्ञ झालों आहे. ह्मणून हें सर्व सोडून देऊन मी तुला शरण आलों आहे. ( ९८ ) सूत सांगतात, याप्रमाणें षण्मुखानें करुणासागर, संसारनाशक व अखंडसुखात्मक शंकरांची स्तुति करून पार्वतीपति शंकराचे ठायीं पूर्ण निष्ठा ठेऊन तो आत्मस्वरूप जाणता झाला. ( ९९ ) हे ऋषिहो, श्रुतितंत्रादि ग्रंथांत गुप्त असलेलें व मुक्ति प्राप्त करून देणारें हें षट्स्थलवर्णनरूपी गोप्य आज तुह्मांस मीं कथन केलें. या विरहित भवसागरापासून तरून जाण्यास दुसरा मार्गच

॥ १०० ॥ यूयं श्रद्धान्विता विप्राः स्थलनिर्णयवेदनम् ॥ व्याकुरुध्वं प्रशान्तेभ्यो भक्तिमभ्येत्य मुक्तिदम् ॥ १०१ ॥ षट्स्थलज्ञानवन्तं तं वीरमाहेश्वरं जनम् ॥ पूजयेध्वं महाभागाः पूजा सा पुरुषार्थदा ॥ १०२ ॥ विद्यायां रमते यस्तु मायां हेयां श्ववद्धेत् ॥ अनेनैव निरुक्तेन वीरमाहेश्वरः स्मृतः ॥ १०३॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन वीरमाहेश्वरं जनम् ॥ आराधयत विप्रेंद्रा यूयं भक्तिपुरस्सरम् ॥ १०४ ॥

इति स्कन्दपुराणे शंकरसंहितायामुपरिभागे षट्स्थलनिर्णयोनाम चतुरशीतितमोऽध्यायः ॥

---

नाहीं. (१००) श्रद्धासंपन्न विप्रहो, तुह्मी हें षट्स्थलांचें मुक्तिदायक ज्ञान शान्त व भक्तिमान् लोकांना सांगा (१०१) षट्स्थलज्ञानवान् जंगमांची तुह्मी पूजा करा. हीच पूजा सकल पुरुषार्थ देणारी होय. (१०२) (वि) विद्येच्या ठायीं (र) रममाण होतो व (मा) मायेच्या ) हे ) हेय ह्मणजे त्याज्य रूपास (श्व) श्वानाप्रमाणें जो सोडून देतो व (र) रहातो तो वीरमाहेश्वर होय. असा वीरमाहेश्वर शब्दाचा अर्थ आहे. (१०३) ह्मणून सर्वप्रकारचे यत्न करून वीरमाहेश्वरांची भक्तिपुरःसर पूजा करा. (१०४) याप्रमाणें स्कंदपुराणांतील शंकरसंहितेच्या वरच्या भागांतील षट्स्थलांचा निर्णय ज्यांत केला आहे असा ८४ वा अध्याय समाप्त झाला.

---

श्रीशिवाय नमः

॥ ऋषय ऊचुः ॥

सूत धर्मविदां श्रेष्ठ ज्ञातमस्माभिरुत्तमम् ॥ वीरशैवाश्रितं-धर्मरहस्यं त्वत्प्रसादतः॥ १ ॥ इदानीं श्रोतुमिच्छामो वीरमाहेश्वरस्य तु ॥ कृतदानफलं पूजाफलं वक्तुं त्वमर्हसि ॥ २ ॥

॥ सूत उवाच ॥

वक्ष्ये भाग्यवतां श्रेष्ठाः प्राणलिंगाङ्गसंगिनः ॥ कृतदान-फलं पूजाफलं माहेश्वरस्य तत् ॥ ३ ॥ पुरा कुमारः पप्रच्छ शंकरं शशिभूषणम् ॥ एतमर्थं महाभागाः प्रोवाचास्मै महेश्वरः ॥ ४ ॥ तच्छृणुध्वं मुनिश्रेष्ठाः पूजादानफलं महत् ॥

॥ शंकर उवाच ॥

वक्ष्यामि शिवभक्तस्य दानमानार्चनाफलम् ॥ ५ ॥ संसार-पाशबंधघ्नं सम्यग्ज्ञानप्रदं नृणाम् ॥ येन केन प्रकारेण शिवभक्त-स्य चेतसः ॥ ६ ॥ यस्तृप्तिं कुरुते मर्त्यः स वै शिवपुरं व्रजेत् ॥ पादप्रक्षालनं यस्तु कुरुते शीतलोदकैः ॥ ७ ॥ वीरमाहेश्वरस्याऽ-

---

ऋषि विचारतात, सूत महाभाग, तुमच्या कृपेनें वीरशैव धर्म व त्या धर्माचें रहस्य आह्मांस समजलें. ( १ ) आतां वीरमाहेश्वरांची पूजा केल्यानें काय फळ प्राप्त होतें तें आह्मांस कथन करा. ( २ ) सूत सांग-तात, महाभाग्यवान् ऋषिहो, माहेश्वरांची पूजा केल्यानें काय फळ होतें तें तुह्मांस मी सांगतों. असाच प्रश्न पूर्वी ( ३ ) षण्मुखानें श्रीशंकरांस केला होता, त्याचें उत्तर, मी सांगणार आहे तसेंच, श्रीशंकरांनीं षण्मुखा-स दिलें होतें, तें तुह्मी मनोभावानें ऐका. ( ४ ) श्रीशंकर ह्मणतात हे षडानना(षण्मुखा) तुला, मी, शिवभक्ताला दान व मान दिल्यापासून काय काय फल होतें तें कथन करितो (५) कोणत्याही प्रकारानें शिवभक्ताच्या अंतःकरणाची तृप्ति केली असतां मनुष्य संसारपाश नाहींसे करणाऱ्या ( ६ ) शिवपुर कैलासास जातो. व थंडगार पाण्यानें जो शिवभक्तांचे पाय धुतो, ( ७ ) तो चारी समुद्रांनीं व्याप्त अशा पृथ्वीचा राजा होईल.

सौ चतुरंबुधिराड् भवेत् ॥ दद्यान्मृद्वासनं यस्तु शिवभक्तस्य सादरम् ॥ ८ ॥ धृतलिंगस्य मर्त्यस्य सप्तद्वीपाधिपो भवेत् ॥ छत्रं चोपानहौ यस्तु चामरे व्यजनानि च ॥९॥ दद्याल्लिंगार्चकायासावैंद्रं पदमवाप्नुयात् ॥ दद्यादन्नं महादेवभक्ताय शिवयोगिने ॥ १० ॥ सर्वपापविनिर्मुक्तः शिवलोके महीयते ॥ यावन्त्यन्नस्य सिक्थानि दत्तानि शिवयोगिने ॥ ११ ॥ तावद्वर्षसहस्राणि भवेच्छिवपुरे सुखी ॥ तैलाभ्यंगं नरो यस्तु कुर्याल्लिंगांगसंगिने ॥ १२ ॥ सूर्यलोकमवाप्नोति सुखमक्षयमाप्नुयात् ॥ दद्यात्पुष्पाणि कर्पूरमिलितं योऽनुलेपनम् ॥ १३ ॥ लिंगार्चनरतायाऽसौ चंद्रलोकमवाप्नुयात् ॥ धनं दद्याद्यथाशक्ति यः पुमांश्छिवयोगिने ॥ १४ ॥ स धनेशत्वमाप्नोति सर्वभोगसमन्वितः ॥ वस्त्रं शीतापनोदार्थं यो दद्याच्छिवयोगिने ॥ १५ ॥ स सर्वभोगसंयुक्तो लभते ब्रह्मणः पदम् ॥ पयस्विनीं सवत्सां गां सर्वालंकारभूषिताम् ॥ १६ ॥ यो दद्याच्छिवभक्ताय स गच्छे-

व लिंगधारी शिवभक्ताला बसावयास मऊ आसन आदरानें देतो, ( ८ ) तो सप्तद्वीप पृथ्वीचा राजा होतो. व जो छत्री, चवरी, जोडे, पंखा, वगैरे लिंग धारण करणाऱ्यांला देतो, (९) त्यास इंद्रपद प्राप्त होतें; व शिवभक्तास आणि शिवयोग्यास अन्न जो देतो, ( १० ) तो सर्व पापांपासून मुक्त होतो. व शिवलोकाप्रत जातो. व शिवयोग्याला अन्नाचीं जितकीं शितें दिलीं असतील, ( ११ ) तितकीं हजार वर्षें शिवपुरांत तो सुखानें राहील. लिंग अंगावर धारण करणाऱ्याला जो तेलाचें अभ्यंग स्नान घालील, ( १२ ) तो सूर्य लोकाला जाईल; व त्याठिकाणीं त्याला अक्षय सुख प्राप्त होईल. व जो मनुष्य लिंगपूजा करणाऱ्यास उत्तम फुलें, व कापूर घातलेली चंदनाची उटी लावतो, ( १३ ) त्यास चंद्रलोक प्राप्त होतो. व शिवयोगी जनानां जो यथाशक्ति धन देतो, ( १४ ) त्यास सर्व प्रकारचे भोग प्राप्त होऊन धनेशत्व ह्मणजे कुबेराचें पद त्याला प्राप्त होतें. व शिवयोग्याला थंडी निवारण्याकरितां जो वस्त्र देतो, ( १५ ) त्याला सर्व भोगयुक्त असें ब्रह्मदेवाचें पद प्राप्त होतें. सर्व प्रकारचे अलंकार गाईवर घालून ती गाय वासरासहवर्तमान जो मनुष्य ( १६ ) शिवभक्ताला

च्छिवसन्निधिम् ॥ सर्वालंकारसंयुक्तां कन्यां सावरणां तु यः ॥ १७ ॥ ज्ञानिने शिवभक्ताय दद्यात्स शिवतां व्रजेत् ॥ संततं संततौ तस्य यान्यपत्यानि भूतले ॥ १८ ॥ कियन्ति तेषां रोमाणि यावन्त्यंगेषु सन्ति वै ॥ तावन्ति वर्षाणि नरो विमानं सूर्यगामिनम् ॥ १९ ॥ आरुह्य सर्वलोकेषु भ्रमन्कन्याप्रदः सुखम् ॥ सर्वभोगान् क्रमाद्भुक्त्वा ततो गच्छेच्छिवैक्यताम् ॥ २० ॥ तस्मात्कन्याप्रदानेन समं दानं न विद्यते ॥ सर्वसस्यान्वितां भूमिं ज्ञानिने शिवयोगिने ॥ २१ ॥ यो दद्याच्छिवसायुज्यं स यात्यत्र न संशयः ॥ दत्तायां भुवि संभूतबीजसंख्यातवत्सरान् ॥ २२ ॥ भूमिदः शांभवे लोके सर्वान्कामानवाप्नुयात् ॥ ज्ञानिने शिवभक्ताय ज्ञानशास्त्रस्य पुस्तकम् ॥२३॥ दद्याच्छैवाय यो मर्त्यः स सम्यग्ज्ञानवान् भवेत् ॥ अक्षराणि च यावंति दत्ते भक्ताय पुस्तके ॥२४॥ तावद्वर्षं शिवागारे स्थित्वाऽन्ते मोक्षमाप्नुयात् ॥ विद्यादानसमं

---

देतो, तो श्रीशिवांच्या जवळ जातो. सर्व प्रकारचीं वस्त्रें व अलंकार घालून कन्या जो शिवभक्ताला देतो, ( १७ ) तो शिवसायुज्याप्रत जातो. ह्या भूतलावर ज्यास कन्या दान केली त्यास त्या कन्येपासून प्राप्त होणाऱ्या संततीचे अंगावर जितके केंस असतील तितकीं वर्षें सूर्यलोकास जाण्याच्या विमानांत ( १८–१९ ) बसवून, सर्व लोकांतरीं फिरवून, क्रमानें सर्व भोग त्यास प्राप्त होतात; व शेवटीं शिवैक्याप्रत तो जातो. ( २० ) ह्मणून कन्याप्रदानासारखें दान दुसरें कोणतेंच नाहीं. सर्वप्रकारचें धान्य ज्या शेतांत आलेलें आहे असें शेत जो शिवयोगीजनाला दान करील, ( २१ ) तो शिवसायुज्य मुक्तीला जाईल यांत संदेह नाहीं. व अशा प्रकारानें दिलेल्या भूमींत जितकीं बीजें ( दाणे ) उत्पन्न होतील ( २२ ) तितकीं वर्षें भूमिदान देणारा शिवलोकांत वास करील, व त्याचे सर्व इष्ट हेतु त्यास प्राप्त होतील. ज्ञानवान् शिवभक्ताला ज्ञानशास्त्राचें पुस्तक जो देईल, ( २३ ) त्याला उत्तम प्रकारचें ज्ञान प्राप्त होईल. व शिवभक्ताला दिलेल्या पुस्तकांत जितकीं अक्षरें असतील ( २४ ) तितकीं वर्षें

दानं नास्ति लोकेषु सर्वदा ॥ २५ ॥ विद्यया प्राणिनां मुक्तिस्त-स्मात्तद्दानमुत्तमम् ॥ ध्यानानामुत्तमं यद्वच्छिवध्यानं प्रकीर्तितम् ॥ २६ ॥ दानानामुत्तमं तद्वद्विद्यादानमुदीरितम् ॥ यो दद्या-च्छिवभक्ताय विद्याकोशस्य पुस्तकम् ॥ २७ ॥ सर्वकर्मविनि-र्मुक्तो न पिबेज्जननीस्तनम् ॥ दानानां च समस्तानां चत्वार्येता-नि भूतले ॥ २८ ॥ श्रेष्ठानि कन्यागोभूमिविद्यादानानि स-र्वदा ॥ कारयित्वा गृहं सम्यक्सर्वोपकरणान्वितम् ॥ २९ ॥ लिं-गाङ्गसंगिने दद्याद्यःस शैवं पदं व्रजेत् ॥ कृत्वा सुतूलरचितां शय्यां फुल्लां च योगिने ॥ ३० ॥ दद्याच्छैवाय स पुमान्पूर्वव-ल्लोकमाप्नुयात् ॥ आत्मनो यदभीष्टं तु तेन द्रव्येण पूजयेत् ॥ ३१ ॥ शिवभक्तं महाज्ञानं तस्मै शंभुःप्रसीदति ॥ पुरा कश्चिद्द्विजश्रेष्ठो वेदाध्ययनतत्परः ॥ ३२ ॥ समस्तशास्त्रतत्वज्ञः शिवपूजापरायणः ॥

---

शिवमंदिरांत वास घडून शेवटीं मोक्ष प्राप्त होईल. ह्या मृत्युलोकीं विद्या-दानासारखें कोणतेंच उत्तम दान नाहीं. ( २५ ) प्राण्यांची मुक्ति विद्ये-पासून होते, ह्मणून विद्यादानच वरिष्ठ आहे. सर्व ध्यानांत शिवध्यान जसें श्रेष्ठ आहे, तसें ( २६ ) सर्व दानांत विद्यादान वरिष्ठ होय जो शिवभ-क्ताला विद्याकोशाचें पुस्तक ( डिक्शनरी ) देतो, ( २७ ) तो सर्व कर्मा पासून मुक्त होऊन त्यास पुनर्जन्म प्राप्त होणार नाहीं. दानांत खालील चार दानें वरिष्ठ गणलीं आहेत. ( २८ ) कन्यादान, गोदान, भूमिदान आणि विद्यादान, अशीं चार दानें मुख्य आहेत. सर्व प्रकाराचीं साधनेंभांडीं, धान्य, वगैरे आणून घरांत तीं ठेऊन तें घर जो ( २९ ) लिंगधारण करणाऱ्या मनुष्याला समर्पण करितो, तो शिवपदाला पोंचतो मऊ काप-साची केलेली गादी तयार करून तीवर सुरम्य नकशी काढून ती गादी शिवभक्ताला ( ३० ) दिली तर पूर्वीं वर्णन केलेली मुक्ति प्राप्त होते. व आपल्याला जी वस्तु आवडते त्या वस्तूनें महाज्ञानी शिवभक्ताची पूजा केली तर ( ३१ ) श्रीशंकर प्रसन्न होतात. पूर्वीं वेदाध्ययन करणारा कोणी एक श्वेत नांवाचा द्विजश्रेष्ठ होता. ( ३२ ) तो सर्व शास्त्रांत पा-

प्राणलिंगाङ्गसंबंधी शिवभक्तार्चनप्रियः ॥ ३३ ॥ शिवक्षेत्रेक्षणाकांक्षी सदा भस्मावकुंठितः ॥ रुद्राक्षमालाभरणः श्रीमत्पंचाक्षरप्रियः ॥ ३४ ॥ रुद्राध्यायजपावाप्तसम्यग्ज्ञानो जितेन्द्रियः ॥ नाम्ना श्वेत इति ख्यातः पुराणागमतत्ववित् ॥ ३५ ॥ आसीत्कुशस्थले रम्ये नगरे पुण्यकृत्तमः ॥ पिंगलो नाम तस्यासीत्पुत्रः परमपापकृत् ॥ ३६ ॥ प्राणिहिंसापरो नित्यं कृतघ्नः साधुनिंदकः ॥ वापीकूपतडागानां जलं तेनैव दूषितम् ॥ ३७ ॥ साधूनां ब्राह्मणानां च तेन दत्तं महद्विषम् ॥ बलाद्द्विजस्त्रियो भुक्ताः रूपलावण्यसंयुताः ॥३८॥ तेन च्छिन्नाः सदारामवृक्षाः पुष्पफलान्विताः ॥ हत्वा सर्वान् जनान्मार्गे हृत्वा तेषां धनानि च ॥ ३९ ॥ विटानां च नटानां च दत्वा गानोपजीविनाम् ॥ दुर्वृत्तानां महामूर्खः सदा वेश्यापरोऽभवत् ॥ ४० ॥

---

रंगत होता; व शिवपूजेंत व लिंगधारी शिवभक्तांच्या पूजेंत तो नेहमीं निमग्न असे. त्यानें प्राणलिंग धारण केलें होतें. तो ( ३३ ) नेहमीं शरीराला भस्मावलेपन करीत असे. शिवक्षेत्रांचें दर्शन घेण्याची त्यास फार उत्कट इच्छा असे. ( ३४ ) व नेहमीं तो रुद्राध्यायाचा जप करीत असे. यामुळें त्यास सत्यज्ञान प्राप्त झालें होतें. हा ब्राह्मण जितेंद्रिय होता व पुराण, आगम, वेद, इत्यादि ग्रंथांत तो प्रवीण होता. हा श्वेत नांवाचा ब्राह्मण ( ३५ ) कुशस्थल नामक रम्य नगरांत वास्तव्य करीत असे. त्याला पिंगल नांवाचा अतिशय पापी पुत्र होता. ( ३६ ) तो नेहमीं प्राण्यांची हिंसा करीत असे; साधूंची निंदा करी; वापी, कूप, तडाग, वगैरे जलाशयांचें उदक त्यानें अगदीं दूषित करून टाकलें होतें. ( ३७ ) साधूंनां व ब्राह्मणांस त्यानें अतिघातक असें विष दिलें होतें. द्विजांच्या रूपलावण्ययुक्त स्त्रिया त्यानें बलात्कारानें भ्रष्ट केल्या. ( ३८ ) उत्तमोत्तम वृक्ष, बागबगीचे, त्यानें निर्मूल करून टाकिले. व पांथस्थ लोक प्रवास करितांना त्यांचे मार्गांत त्यांचें धन हिरावून घेण्यांत तो प्रवीण होताच. ( ३९ ) व अशा रीतीनें संपादन केलेलें धन तमासगीर, नाटकवाले, वगैरे दुष्ट मंडळीस देऊन वेश्यासंगतीलाही तो महामूर्ख लागला होता. ( ४० )

मातृहा भ्रातृहा तद्वत्पितृद्रोही यथाबलम् ॥ तेन शंकरसद्मानि बा-
धितानि शिवार्चकाः ॥ ४१ ॥ रुद्राक्षमालाभरणाः शिवलांछनधा-
रिणः ॥उपद्रुताः सदाचारनिरताः पापकर्मणा॥४२॥ यज्ञविध्वंसको
नित्यं देवतावेददूषकः ॥ अगारदाही क्रूरात्मा महासाहसिको-
त्तमः ॥ ४३ ॥ स्वच्छन्दो निर्घृणो धीरो मित्रद्रोही निरंतरम् ॥
शिवभक्तापराधी च शिवद्रोही दुरात्मवान् ॥ ४४ ॥ चंडालस्त्री-
पतिर्भूत्वा चचारावनिमंडले ॥ दुर्वृत्तसंगरतिमान् मधुमांसादि-
भक्षकः ॥ ४५ ॥ एवं हि वर्तमानं तं दुराचारशतान्वितम् ॥ पु-
त्रमालोक्य स पिता निर्वेदादिदमब्रवीत् ॥ ४६ ॥ दुराचारमिमं
वत्स त्यज दुर्वृत्तलालितम् ॥ अत्यपूर्वमिदं जन्म दुर्लभं ब्राह्मणा-
न्वये ॥ ४७ ॥ उपस्थितं तव खलु स्वर्गमोक्षैककारणम् ॥ विचा-
र्यात्र धिया सर्वं साधु यत्तद्धितं कुरु ॥ ४८ ॥ आत्मनश्च हितं

---

त्यानें आपल्या मातेस व भावास त्रास देऊन होईल तितका द्वेष तो बा-
पाचाही करूं लागला. त्यानें शंकराचीं देवळें मोडून ह्मणजे भ्रष्ट करून
टाकिलीं. ( ४१ ) रुद्राक्षमाला धारण करणारे, शिवचिन्हें लिंग, भस्म,
वगैरे, धारण करणारे व सदाचारसंपन्न असे शिवभक्तही त्यानें नाहींसे करून
टाकिले होते. ( ४२ ) सदां सर्वदां तो देवांचा व वेदांचा द्वेष करी आ-
णि यज्ञ नाहींसे करण्याकडे त्याचें लक्ष फार असे. लोकांचीं घरें जाळून
टाकी. ( ४३ ) मित्रांचा द्रोह करी. दुष्ट दुरात्मा स्वेच्छाचारी असा तो
पिंगल नांवाचा श्वेतपुत्र शिवभक्तांना फार त्रास देई व शिवाचा फार
द्वेष करी. ( ४४ ) त्यानें चण्डाळ जातीच्या स्त्रीशीं आपलें लग्न करून
घेऊन सुखानें तो पृथ्वीवर फिरत असे. दुष्टजनांचा सहवास करून तो
दारू मांस वगैरेही यथेष्ट भक्षण करीत असे. ( ४५ ) याप्रमाणें आपल्या
मुलास उद्देशून तो श्वेत ब्राह्मण पश्चात्ताप पावून ह्मणाला ( ४६ ) हे व-
त्सा, दुर्जनांस योग्य असा हा अनाचार तूं टाकून दे. ब्राह्मणवंशांत तुला
जन्म प्राप्त झाला आहे हा अति दुर्लभ आहे. ( ४७ ) मोक्ष प्राप्त हो-
ण्यास हें एक साधनच आहे. याकरितां बुद्धिपूर्वक विचार करून जें चां-
गलें त्याचाच स्वीकार कर. ( ४८ ) मी तुला हितकारक होणारेंच कर्म

वक्ष्ये शृणुष्वैकाग्रमानसः ॥ श्रुत्वा कुरुष्व तद्वत्स मत्तः कोऽन्यो हितं वदेत् ॥ ४९ ॥ वेदागमपुराणेषु प्रोक्तं कर्म समाचर ॥ शुश्रूषस्व गुरून्वृद्धान्प्राणिहिंसाविवर्जितः ॥ ५० ॥ न यावन्मृत्युरायाति न जरा यावदाक्रमेत् ॥ यावन्नेंद्रियशैथिल्यं तावदाराधयेश्वरम् ॥ ५१ ॥ चतुराशीतिलक्षेषु जन्तुर्भूत्वाथ जन्मसु ॥ केनचित्पुण्ययोगेन मानुष्यं लभते जनः ॥ ५२ ॥ अनेकजन्मसाहस्रकृतपुण्यवशेन सः ॥ तत्रापि ब्राह्मणं जन्म लभते कालयोगतः ॥ ५३ ॥ लब्ध्वैतदुत्तमं जन्म ब्राह्मण्यं यः पुमांश्छिवम् ॥ नार्चयेत्स शिवद्रोही स एव ब्रह्महा भवेत् ॥ ५४ ॥ वर्णाश्रमाचाररतैः पुरुषैः सुव्रतैः शिवः ॥ आराध्यते महादेवो दुर्वृत्तैर्न कदाचन ॥५५॥ अतिचंचलमायुष्यं यौवनं चातिभंगुरम् ॥ अश्वत्थचलपत्राग्रलम्बमानोदबिंदुवत् ॥ ५६ ॥ जरा भीषयते देहं मांसरक्तापहारि-

---

सांगतों, तें एकाग्र अंतःकरणानें श्रवण कर. व ऐकून घेऊन तेंच आचरण कर. हे बाळका, माझ्या शिवाय दुसरा कोण तुला तुझ्या कल्याणाची गोष्ट सांगणार आहे? ( ४९ ) वेद, आगम, पुराणें, इत्यादिकांत जें कर्म सांगितलेलें आहे तेंच कर. प्राण्यांची हिंसा करूं नको. व गुरुजनांची व वाडवडिलांची सेवा कर. ( ५० ) जोंपर्यंत मृत्यु प्राप्त होणार नाहीं व जोंपर्यंत वृद्धपणा आला नाहीं, जोंपर्यंत इंद्रियें शिथिल ( ढिलीं ) झालीं नाहींत, तोंपर्यंत ईश्वराची पूजा कर. ( ५१ ) चवऱ्यायशीं लक्ष जन्मांमध्यें असतां जीवास पुण्यबलानें मनुष्ययोनि प्राप्त झाली आहे. ( ५२ ) अनेक जन्मांतरीं पुण्य केलें तर कालेंकरून ब्राह्मणजन्म प्राप्त होतो. ( ५३ ) हा उत्तम ब्राह्मणजन्म प्राप्त झाल्यावर जो नर शंकरांची उपासना करणार नाहीं, तो शिवद्रोही समजावा. व त्यास ब्रह्महत्येचें पातक लागतें. ( ५४ ) वर्णाश्रमधर्माप्रमाणें वागणारे व व्रततपादि आचरण करणारेच फक्त शिवाचें आराधन करितात. दुर्जनांची शिवाचे ठायीं भक्ति उत्पन्न होत नाहीं. ( ५५ ) हें आयुष्य क्षणभंगुर आहे. व ही यौवनदशा पिंपळाच्या चंचळ पानावरील लांब झालेल्या पाण्याच्या थेंबाप्रमाणें अति चंचल आहे. ( ५६ ) मांस व रक्त

णी ॥ नरं विचाररहितं तमसीव पिशाचिका ॥ ९७ ॥ मृत्युर्ग्रसिष्य शिरसि नृत्यति त्वविवेकिनः ॥ नरस्येवामिषाकांक्षी श्येनो नभसि शीघ्रगः ॥ ९८ ॥ अधीतिरागता श्रीर्मे भोक्ष्ये सर्वसुखान्यहम् ॥ इति यावत्पुमानिच्छेत्तावन्मृत्युर्ग्रसेन्नरम् ॥ ९९ ॥ संसाराख्ये महाक्षेत्रे कालाख्यः कर्षको महान् ॥ उप्तानि जीवबीजानि पक्वान्यालोक्य खादति ॥ ६० ॥ जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ॥ तस्माद्दुराचारमिमं त्यक्त्वाऽर्चय सदाशिवम् ॥ ६१ ॥ शिवभक्तान् सदाचारनिरतान्धृतलिंगकान् ॥ द्विजानाराधय सदा भस्मरुद्राक्षधारिणः ॥ ६२ ॥ एवं संबोधितस्तेन पित्रा श्वेतेन पिंगलः ॥ न मुमोच दुराचारं कठिनत्वमिवोपलः ॥६३॥ न तिष्ठति सदाचारो भिन्ने मनसि तस्य तत् ॥ तेनोदितं हिततमं

---

नाहींशी करणारी वृद्धावस्था देहास निर्जीव करून टाकते. व अति भयंकर पिशाचा प्रमाणें अविचारी मनुष्याला ती भिवविते. ( ९७ ) अविवेकी मनुष्याचे डोक्यावर मृत्यु नाचतो व त्याला भक्षण करून टाकतो. ज्याप्रमाणें आकाशांत अति वेगानें जाणारा गिधाड पक्षी मांसाकरितां एकदम खालीं उडी टाकितो, तसें ( ९८ ) "मला संपत्ति प्राप्त झाली आहे, आतां काय भीति आहे? आतां सर्व प्रकारचीं सुखें मला भोगावयास सांपडतील" याप्रमाणें जोंपर्यंत मनुष्य विचार करितो, तोंपर्यंत मृत्यु येऊन झडप घालून त्या मनुष्याला उचलून नेतो. ( ९९ ) संसाररूपी अवाढव्य शेतांत काळ या नांवाचा एक शेतकरी आहे. त्यानें जीवरूपी बीं ह्या संसाररूपी जमिनींत पेरलें आहे. त्यांतील जीं बीजें फलद्रूप झालीं असतील त्यांस तो खाऊन टाकितो. ( ६० ) जो जन्मास आला त्यास मृत्यु हा ठेवलेलाच आहे. व ज्यास मृत्यु आला त्यास निश्चयानें जन्म प्राप्त होतो. ह्मणून सर्व दुराचार सोडून देऊन श्रीशंकरांची पूजा कर. (६१) सदाचारी, लिंगधारी, शिवभक्त व भस्म रुद्राक्षधारण करणारे अशा द्विज श्रेष्ठांस पूजा समर्पण कर. ( ६२ ) याप्रमाणें उपदेश बापानें केला. तरी पिंगल ब्राह्मण दुष्ट व दुराचारी असल्यामुळें त्यानें आपला दुराचार सोडला नाहीं. ( ६३ ) त्या दुराचारी पिंगलाच्या चंचळ मनास पित्यानें

भिन्नकुम्भे यथा जलम् ॥ ६४ ॥ ततःकालेन महता कृतपापवशेन सः ॥ रोगावृततनुर्ब्रह्मरक्षसाविष्टमानसः ॥ ६५ ॥ अतीवदुःख संतप्तो दुरात्मा पिंगलोऽभवत् ॥ न निद्रां लभते रात्रौ दिवा न सुखमश्नुते ॥ ६६ ॥ अत्युत्कटैः पुण्यपापैरिहैव फलमश्नुते ॥ रोगाभिभूततनयं पिता शुश्राव धर्मवित् ॥ ६७ ॥ पुत्रव्यसनसंतप्तो निर्गतः प्राणवत्सुधीः ॥ पपात भूमौ सहसा श्रुतपुत्रामयो भृशं ॥ ६८ ॥ प्राप्तसंज्ञः स धर्मज्ञो रुरोद करुणं बहु ॥ शोकसंलग्नहृदयो विललापाकुलेंद्रियः ॥ ६९ ॥ हाहाऽद्य मंदभाग्योऽस्मि मम पुत्रोऽयमीदृशीम् ॥ विधिना प्रापितोऽवस्थां न जानेऽस्याः प्रतिक्रियाम् ॥ ७० ॥ अविद्वानथवा विद्वान्दुर्जनः सज्जनोऽपिवा ॥

---

सांगितलेला तो सदाचार रुचला नाहीं. फुटलेल्या मडक्यांत जसें पाणी टिकत नाहीं, त्याचप्रमाणें पित्याचा सदाचाराबद्दल उपदेश त्या पिंगलांच्या मनांत टिकला नाहीं. ( ६४ ) अति पापकर्म झाल्यानें कांहीं काळानंतर त्याला नाना रोग झाले व ब्रह्मराक्षसाची बाधा त्यास झाली. ( ६५ ) रोगपीडेनें अति दुःख झाल्यानें त्यास रात्रंदिवस झोंप येई नाशी झाली. ( ६६ ) पुण्यपापांच्या भोगांविषयीं असा नियम आहे कीं, अति उग्र पुण्य झालें किंवा पाप झालें तर त्यांचें फल मनुष्यास ह्याच जन्मांत भोगावें लागतें. असो. याप्रमाणें अति पापसंचयानें तो पिंगल रोगपीडेनें व्यथित झाला. हें वर्तमान पिंगलाच्या बापाला समजलें. ( ६७ ) आपल्या मुलास रोग झाला हें ऐकून देहांतून जसा प्राण जावा तसा श्वेत आपल्या घरांतून निघाला व वाटेंत अडखळत अडखळत आपल्या मुलांकडे जावयास निघाला व वाटेंत पडला आणि त्यास मूर्च्छा आली. ( ६८ ) मग शुद्धीवर येऊन तो श्वेत ब्राह्मण करुणायुक्त दीन स्वरानें रडूं लागला. ( ६९ ) तो ह्मणाला हाय हाय! आज मी किती मंदभागी आहे! माझा मुलगा ह्या नीच अवस्थेंत पडला आहे. ह्याची सुटका कशी करावी हें मजला समजत नाहीं. ( ७० ) मला वाटतें कीं, पुत्र विद्वान असो किंवा अविद्वान असो, दुर्जन असो वा सज्जन असो, कसाही असला तरी पुत्र ज्या मनुष्याला आहे तोच खरा धन्य व तोच खरा ज्ञा-

यस्यास्ति भूतले पुत्रः स धन्यः स च भाग्यवान् ॥७१॥ अतो मद्भा ग्यदौर्बल्यादीदृशीं कालचोदितां ॥ अवस्थां विधिना नीतस्तच्चिकित्सां न वेद्म्यहम् ॥ ७२ ॥ एवं प्रलपतस्तस्य पुरतो भाग्यगौरवात् ॥ आविर्बभूव सर्वज्ञः सखा तस्य हरप्रियः ॥ ७३ ॥ त्रिपुण्ड्रांकितदीप्तांगो जटावल्कलशोभितः ॥ सखा श्वेतस्य शिष्टोऽसौ रुद्राध्यायजपप्रियः ॥ ७४ ॥ तं दृष्ट्वा विलपंतं तं श्वेतं किमिति पृष्टवान् ॥ स तस्मै कथयामास पुत्रवृत्तमशेषतः ॥ ७५ ॥ श्रुत्वा सर्वं यथावृत्तं शिवभक्तो हरप्रियः ॥ तस्य दुःखोपशमनं प्रतीकारं जगाद सः ॥ ७६॥ शिवभक्त महाबुद्धे मा रोदीस्स्थैर्यमावह ॥ पुत्रस्य दुःखशान्त्यर्थमुपायं वच्मि तेऽनघ ॥ ७७ ॥ अस्ति भूमौ महापुण्यः पुराणो विबुधाश्रयः ॥ श्रीपर्वत इतिख्यातः सर्वशैलोत्तमोत्तमः ॥ ७८ ॥ अप्सरोदेवगंधर्वविद्याधरगणाकुलः ॥ प्रमथव्रजसंकीर्णस्तपस्विकुलभूषणः ॥ ७९ ॥ पारदाम्बुरुहव्याप्तो महौष-

---

ग्यवान् होय. ( ७१ ) आतां माझ्या दुर्दैवानें माझ्या मुलाला जी ही कुदशा प्राप्त झाली आहे ती कशी नाहींशी होईल याचें साधन मजला कांहींच सुचत नाहीं. ( ७२ ) याप्रमाणें रडत असतां त्या श्वेताचे सुदैवानें ( ७३ ) त्रिपुंड्र लावलेला, जटा वल्कलें धारण केलेला, रुद्राध्यायाचा जप करणारा, असा त्या श्वेताचा हरप्रिय नांवाचा मित्र तेथें आला. ( ७४ ) श्वेताला रडतांना पाहून, हरप्रिय त्यास रडण्याचें कारण विचारूं लागला; व त्यानें आपल्या पुत्राचें इतिवर्तमान हरप्रियास सांगितलें. ( ७५ ) तेव्हां तो शिवभक्त हरप्रिय नांवाचा ब्राह्मण श्वेतपुत्राचें सर्व वर्तमान ऐकून त्याच्या दुःखाचा परिहार होण्याकरितां उपाय श्वेतास सांगूं लागला. ( ७६ ) तो ह्मणाला हे शिवभक्त श्वेता, तूं रडूं नको, धीर धर. हे पुण्य पुरुषा श्वेता, तुझ्या पुत्राच्या रोगनिवारणार्थ तुला मी एक उपाय सांगतों. ( ७७ ) ह्या भूमितलावर सज्जन लोकांस राहण्यास योग्य, व सर्व पर्वतांत जुना व उत्तम, असा श्रीपर्वत या नांवाचा एक पर्वत आहे. ( ७८ ) ह्या पर्वतावर अप्सरा, देव, गंधर्व, विद्याधर, प्रमथगण व महान् महान् तपस्वी लोक पुष्कळ आहेत. ( ७९ ) ह्या पर्व-

धिगणालयः ॥ रसायनफलाक्रान्तवृक्षाधारो धराधरः ॥ ८० ॥ गुहासहस्रसंबद्धो बिलद्वारशतांकितः ॥ नानामृगगणावासस्तुंग श्रृंगोल्लिखन्नभाः ॥ ८१ ॥ पुण्यकृद्भिरवाप्योऽसावप्राप्यः पापकर्मभिः ॥ मल्लिकार्जुनदेवस्य पीठभूतो महागिरिः ॥ ८२ ॥ यत्र विष्णुस्तपस्तप्त्वा भक्त्या श्रीमल्लिकार्जुनम् ॥ समाराध्य शिवज्ञानं प्राप्तवान् स्थितिकर्तृताम् ॥ ८३ ॥ यत्न श्रीकण्ठमीशानं समाराध्य पितामहः ॥ प्रसादान्मल्लिकेशस्य जगत्सृष्टिक्षमोऽभवत् ॥८४॥ यत्र भक्त्या समाराध्य शक्रः श्रीमल्लिकार्जुनं ॥ प्रसादात्तस्य देवस्य त्रैलोक्येशो बभूव सः ॥ ८५ ॥ यत्र देवास्सगन्धर्वा देवं श्रीमल्लिकार्जुनम् ॥ समाराध्येप्सितां सिद्धिमवापुर्मुनयोऽपिच ॥ ८६ ॥ श्वपचादिविशिष्टान्ता यत्र दर्शनमात्रतः ॥ न पिबन्ति नरा मातुस्तन्यं नात्र विचारणा ॥ ८७ ॥ यत्र मर्त्यो महापाप-

---

तावर पारद नांवाचे वृक्ष व इतर औषधी व रसायनोपयोगी वृक्षही पुष्कळ आहेत, व नाना प्रकारच्या वेली मुळें फळेंहीं फार आहेत. (८०) ह्या पर्वतावर पुष्कळ गुहा, बिळें, भुयारें वगैरे आहेत. नाना प्रकारचे मृगादि पशु आहेत. व आकाशाशीं स्पर्धा करणारे असे अनेक उंच उंच वृक्ष आहेत. ( ८१ ) हा पर्वत पुण्यवान् लोकांसच प्राप्त होतो. पापी लोकांस येथें येववत नाहीं. ह्या पर्वतावर मल्लिकार्जुन देवाचें वसतिस्थान आहे.( ८२ ) ह्याच पर्वतावर तपश्चर्या करून श्री विष्णूला सृष्टीचें रक्षण करण्याची शक्ति प्राप्त झाली. ( ८३ ) याच स्थलीं श्री ब्रह्मदेव शंकरांचें आराधन करून शंकरांच्या प्रसादानें जगदुत्पत्ति करण्याची शक्ति त्यांस प्राप्त झाली. ( ८४ ) याच ठिकाणीं इंद्रादि देवांस मल्लिकार्जुन देवाची आराधना करून आपापले अधिकार त्यांस प्राप्त झाले. ( ८५ ) व येथेंच गंधर्व, यक्ष किन्नर वगैरे देवांनीं व मुनिजनांनींहीं आपापले इच्छित हेतु प्राप्त करून घेतले. ( ८६ ) ह्या देवाच्या दर्शनमात्रेंकरून चांडालादि जनांना पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं यांत विचार करण्याची अवश्यकता नाहीं. ( ८७ ) याच ठिकाणीं कोणी अति पापी असून जर

युक्तोऽपि मरणं गतः ॥ शिवसायुज्यमाप्नोति परमानंदलक्षणम् ॥ ८८ ॥ यत्र पंचत्वमापन्नाः पशुपक्षिमृगादयः ॥ गच्छन्ति शिवसायुज्यं जायन्ते न पुनर्भुवि ॥ ८९ ॥ यत्र दत्तं धनं धान्यमन्नं वा शिवयोगिने ॥ भक्ताय तत्फलं वक्तुं न मया शक्यते पुनः ॥९०॥ तस्मिञ्छ्रीपर्वते पुण्ये संसारामयभेषजे ॥ आस्ते लिंगांगसंबंधी सदानंदाह्वयो मुनिः ॥ ९१ ॥ सर्वोपनिषदर्थज्ञः शिवध्यानपरायणः ॥ भस्मावलिप्तसर्वांगो रुद्राध्यायजपाश्रयः ॥ ९२ ॥ रुद्राक्षमालाभरणो धृतपाशुपतव्रतः ॥ अतिवर्णाश्रमी योगी जीवन्मुक्तो जगद्गुरुः ॥ ९३ ॥ तं सदानंदनामानं शंकरध्यानलालसम् ॥ निरस्तकुहकं विप्र सह पुत्रेण पूजय ॥ ९४ ॥ तस्य प्रसादात्ते पुत्रो गच्छेन्नीरोगतां ध्रुवम् ॥ तस्मादुत्तिष्ठ गच्छ त्वं श्री पर्वतमतंद्रितः ॥ ९५ ॥ इतःपरतरो लोके नास्त्युपायः प्रशान्तये॥

---

मरण पावेल तर परमानंदात्मक शंकरांच्या ठायीं सायुज्यता मुक्ति त्यास प्राप्त होईल. ( ८८ ) याच पर्वतावर जर पशुपाक्षि मृग आदिकरून मरण पावतील तर त्यांसही शिवसायुज्य प्राप्त होईल व पुनर्जन्माची त्यांस भीति राहणार नाहीं. ( ८९ ) या ठिकाणीं धन धान्य आदि पदार्थ शिवयोग्यास जर दान केले तर त्यांपासून होणारें फळ मला सुद्धां सांगतां येत नाहीं. ( ९० ) त्या पुण्यमय व संसाररोग नाशक श्रीपर्वतावर लिंग धारण करणारा सदानंद या नांवाचा एक महात्मा राहतो. ( ९१ ) उपनिषदांतील अर्थ जाणणारा शिव ध्यानांत निमग्न असलेला, सर्व शरीराला भस्म लावलेला व रुद्राध्यायाचा जप करीत असून ( ९२ ) रुद्राक्षाच्या माळा धारण करणारा, आणि पाशुपत व्रत घेऊन चतुर्थाश्रमांत राहणारा, व महायोगपरायण, व जीवन्मुक्त असा तो सदानंद महात्मा, शंकरध्यानाबद्दल अत्युत्सुक आहे. अशा त्या सदानंदाला सर्व संशय सोडून देऊन मनःपूर्वक आपल्या पुत्रासहवर्तमान शरण जा. आणि त्याला पूजा समर्पण कर. ( ९४ ) त्या महात्म्याच्या प्रसादानें तुझा पुत्र निरोगी होईल. ह्मणून तूं आतां ऊठ आणि श्रीपर्वतावर जाऊन सदानंद महात्म्याला शरण जा. ( ९५ ) हे श्वेता तुझ्या पुत्राचा रोग शमन हो-

विना शंकरभक्तस्य पूजया नात्र संशयः ॥ ९६ ॥ पूजया शिव-भक्तस्य भोगमोक्षौ प्रसिध्यतः ॥ नान्यैःक्रियासमारंभैस्ते सुतस्या-मयक्षयः ॥ ९७ ॥ एवं हरप्रियेणोक्तः श्वेतः श्रीपर्वतं गतः ॥ सह पुत्रेण चार्येन्न भार्यया बंधुबान्धवैः ॥ ९८ ॥ स्नात्वा पाताल-गंगायां भक्त्या श्रीमल्लिकार्जुनम् ॥ पूजयामास विप्रेन्द्रःश्री पर्वतपतिं हरम् ॥ ९९ ॥ लिंगिभ्यः शिवभक्तेभ्यः पुत्रभार्यादि-भिःसह ॥ ददौ तत्र धनं धान्यं तैलमन्नं च गां महीं ॥ १०० ॥ प्राग्द्वारे मल्लिकेशस्य जटावल्कलधारिणम् ॥ हरप्रियेण कथितं सदानंदं ददर्श सः ॥ १०१ ॥ प्रणम्य सह पुत्रेण सर्वं तस्मै न्यवे-दयत् ॥ पुत्रवृत्तं धनं किंचिद्दत्त्वा स शिवयोगिने ॥ १०२ ॥ सर्वं विज्ञापयामास सदानंदाय स द्विजः ॥ श्रुत्वाऽथ तदशेषेण सदान-न्दो महामुनिः ॥ १०३ ॥ शिवभक्तिप्रभावेन शिष्यत्वेन तमग्र-

ण्याकरितां त्या महात्म्याला शरण जाण्याखेरीज दुसरा उपाय या जगत्त्र-यांत नाहीं. रोगशमनार्थ शंकरभक्ताचीच पूजा केली पाहिजे. ( ९६ ) शिवभक्ताच्या पूजेनें नाना प्रकारचे भोग्य पदार्थ प्राप्त होऊन मोक्षही प्राप्त होतो. व इतर क्रियांचा जरी आश्रय केला तरी वरील दोनही हेतु साध्य होत नाहींत व इतर क्रियांनीं तुझ्या पुत्राचा रोग नाहींसा होणार नाहीं. ( ९७ )याप्रमाणें हरप्रियानें श्वेताला सांगितल्यावर श्वेत श्रीपर्वतावर पुत्र, भार्या, बांधव यांसहवर्तमान गेला. ( ९८ ) पातालगंगेंत स्नान करून श्री पर्वतेश्वर मल्लिकार्जुनाची भक्तीनें श्वेतानें पूजा केली. ( ९९ ) तेथें असलेले लिंगधारी शिवभक्तांना धन, धान्य, तैल, अन्न, गाई, भूमि, वगैरेंचीं दानें त्यानें दिलीं. ( १०० ) नंतर मल्लिकार्जुनाच्या पूर्वद्वारीं जटावल्कलें धारण केलेला व हरप्रियानें सांगितलेला जो सदानंद महात्मा होता त्यास श्वेतानें पाहिलें. ( १०१ ) पुत्रासहवर्तमान त्याला नमस्कार करून त्याला द्रव्य देऊन पुत्राचा सर्व वृत्तांत त्यानें सांगितला. ( १०२ ) त्या श्वेत नांवाच्या ब्राह्मणानें पुत्राचा सर्व वृत्तांत श्रवण करून सदानंदानें ( १०३ ) त्या श्वेताला आपला शिष्य केला व दुर्वृत्त पिंगलाला पादोदक आणि

हीत् ॥ पादोदकं प्रसादं च पिंगलाय दुरात्मने ॥ १०४ ॥ पापाचाराय स ददौ शिवज्ञानमहोदधिः ॥ तस्य दर्शनमात्रेण सदानंदस्य पिंगलः ॥ १०५ ॥ सर्वरोगविनिर्मुक्तः सत्परिग्रहकारणात् ॥ समस्तपापनिर्मुक्तस्तत्पादोदकदानतः ॥ १०६ ॥ धर्माभिरतिमानासीत्तत्प्रसादोपभुक्तितः ॥ शिवभक्तिपरो जातः पिंगलो मतिमान् धिया ॥ १०७ ॥ ज्ञात्वाऽथ शिवभक्तस्य प्रसादस्य तु वैभवम् ॥ सदानंदाय मुनये शिवभक्ताय धीमते ॥ १०८ ॥ सर्वस्वमार्जितं भक्त्या पिंगलोऽस्मै न्यवेदयत् ॥ तस्य शुश्रूषणं चक्रे सदानंदस्य धीमतः ॥ १०९ ॥ श्वेतपुत्रोऽपि धर्मात्मा सर्वभावेन सर्वदा ॥ तेन तुष्टो महायोगी सदानंदस्तपोधनः ॥ ११० ॥ आहूय पिंगलं शिष्यमिदं वाक्यमभाषत ॥

सदानंद उवाच.

अद्यप्रभृति साधो त्वं त्रिपुण्ड्रं भस्मना वह ॥ १११ ॥ सर्वांगोद्धूलनं नित्यं कुरु धर्मपरायणः ॥ अग्निरित्यादिभिर्मंत्रैः श्रीमत्पं-

---

प्रसाद दिला. ( १०४ ) तेव्हां त्या पापप्रकृति पिंगलाला सदानंदाच्या दर्शनापासून आराम वाटूं लागला. ( १०५ ) व सज्जनांनीं त्याचा स्वीकार केल्यामुळें त्याच्या रोगादि पीडा नाहींशा झाल्या. व सदानंद महात्म्याचें पादोदक घेतल्यामुळें त्याचीं सर्व पातकें नष्ट झालीं. ( १०६ ) प्रसाद ग्रहण केल्यानें धर्माच्या ठायीं पिंगलास पूर्ण श्रद्धा उत्पन्न झाली. शिवभक्ति करण्याची त्यास इच्छा झाली व त्याची बुद्धिसुद्धां सन्मार्गाकडे वळली. ( १०७ ) त्या सदानंद शिवभक्ताच्या प्रसादानें पिंगलास आरोग्य व वैभव प्राप्त झालेसें पाहून पिंगलानें आपलें सर्व धन त्या सदानंदास ( १०८ ) समर्पण केलें. व त्याची मनोभावानें तो पूजा करूं लागला. ( १०९ ) श्वेताचा मुलगा तो पिंगल याची सेवा पाहून महायोगी सदानंद मुनि फार संतुष्ट झाला ( ११० ) व पिंगलास जवळ बोलावून त्यास ह्मणाला भो साधो पिंगला, तूं आजपासून भस्माचा त्रिपुंड्र धारण कर. ( १११ ) 'अग्निरित्यादि' मंत्र अगर श्रीमत्पंचाक्षरी मंत्र ह्मणून

न्चाक्षरेण वा ॥ ११२ ॥ रुद्रमंत्रजपाभ्यासपरो भव समाहितः ॥ यावज्जीवमिदं दत्तमिष्टलिंगं समर्चय ॥ ११४ ॥ कराब्जपीठे विन्यस्य तध्यानासक्तमानसः ॥ लिङ्गाङ्गसंगिनो वत्स पुनर्जन्म न विद्यते ॥ ११४ ॥ युगपद्ज्ञानसंसिद्धिः स्यात्ततो मोक्षमाप्नुयात् ॥ तस्मात्त्वं प्राणलिंगांगसंबंधी भव सर्वदा ॥ ११५ ॥ पंचमुद्रान्विताग्नित्यं शिवभक्तान्समर्चय ॥ बहुनोक्तेन किं वत्स शिवभक्तस्य पूजया ॥ ११६ ॥ भोगमोक्षौ नचान्येन सिध्यतस्तांस्ततोऽर्चय ॥

॥ श्रीशंकर उवाच ॥

इत्यादिष्टोऽथ गुरुणा पिंगलो भक्तिसंयुतः ॥ ११७ ॥ प्रणम्य दण्डवद्भूमौ सदानंदमपूजयत् ॥ अन्येभ्यः शिवभक्तेभ्यो दत्वा सर्वस्वमार्जितम् ॥ ११८ ॥ निस्पृहो निरहंकारो निर्ममो धर्मतत्परः ॥ उवास सुचिरं कालं तस्मिन् श्रीपर्वते शुभे ॥ ११९ ॥

---

भस्म मंत्रावें व सर्व अंगावर भस्म उद्धूलन करावें. ( सर्व अंगाला भस्म लावावें ) ( ११२ ) मी देतों हें इष्टलिंग घे व जीवमान आहे तोंपर्यंत त्या लिंगाची पूजा कर व रुद्रमंत्राचा जप करीत जा. ( ११३ ) हस्त कमलावर मीं दिलेलें हें लिंग ठेऊन त्याचें ध्यान करण्यांत निमग्न रहा. कारण हे वत्सा, लिंगधारण करणाऱ्याला पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं. ( ११४ ) या इष्टलिंगामुळें एकदम ज्ञान प्राप्त होतें व नंतर मोक्षही प्राप्त होतो. ह्मणून हे वत्सा तूं सदां प्राणलिंग धारण कर. (११५) पंच महामुद्रा—कंथा, कमंडलु, दण्ड, भस्म, भिक्षापात्र—धारण करणाऱ्या शिवभक्तांला पूजा समर्पण कर. फार काय सांगावें? शिवभक्तांनां पूजा समर्पण केल्यानें(११६) भोग व मोक्ष दोन्ही साध्य होतात; तर त्यांचीच पूजा कर. श्रीशंकर ह्मणतात, याप्रमाणें गुरूनीं उपदेश केल्यावर भक्तियुक्त होत्साता पिंगल सदानंदाला ( ११७ ) नमस्कार करिता झाला. व त्याची त्यानें पूजा केली. आणि आपण संपादन केलेलें वित्त इतर शिवभक्तांनां त्यानें देऊन टाकिलें. ( ११८ ) निस्पृह व निरहंकार व निर्मम व धर्मतत्पर होत्साता पुष्कळ वर्षेंपर्यंत त्या श्रीपर्वतावर राहून ( ११९ )

ममार सोऽपि कालेन पिंगलो धर्मवत्सलः ॥ मल्लिकार्जुनदेवस्य प्रसादान्मुक्तिमाप सः ॥ १२० ॥ चंडालकन्यापि दिवं तेन भुक्ता जगाम सा ॥ सुहृदो बांधवास्तस्य जग्मुस्ते ब्रह्मणः पदम् ॥ १२१ ॥ पितापि तस्य कालेन श्वेतस्तत्र मुदान्वितः ॥ पूजया शिवभक्तस्य परां मुक्तिमवाप सः ॥ १२२ ॥ अत उक्तप्रकारेण शिवभक्तांस्तपस्विनः ॥ पूजयानिशमव्यग्रो वत्स लिंगांगसंगिनः ॥ १२३ ॥

सूत उवाच.

इत्युक्तः शंकरेणासौ श्रीमद्बर्हिणवाहनः ॥ ननाम गिरिशं स्कन्दः सर्वज्ञं करुणानिधिम् ॥ १२४ ॥ यूयं श्रद्धान्विता विप्रा दानमानार्चनादिभिः ॥ पूजयध्वमतिप्रीत्या शिवभक्तान्महात्मनः ॥ १२५ ॥ एष वः कथितो धर्मः सर्वधर्मोत्तमोत्तमः ॥ शिवप्रीतिकरो विप्राः शिवभक्तार्चनांकिताः ॥ १२६ ॥ नातः परतरो धर्मस्त्रिषु लोकेषु वर्तते ॥ तस्माद्धर्ममिमं नित्यं कुरुध्वं यत्नतो द्विजाः ॥ १२७॥ नदीनामुत्तमा गंगा धर्माणां शंकराश्रयः ॥

---

कालवशात् तो मरून गेला. व मल्लिकार्जुनाच्या प्रसादानें त्याला मोक्ष प्राप्त झाला. (१२०) त्यानें वाळगलेली चांडाळाची मुलगी स्वर्गलोकाला गेली व त्याचे बंधुवर्गही ब्रह्मपदाला गेले.(१२१) त्याचा पिता श्वेतही कांहीं काळानें आनंदित होत्साता शिवभक्तांची पूजा करून शेवटीं परम मोक्षाला तो गेला. (१२२)ह्मणून हे वत्सा, (मुला,लिंगधारण करणाऱ्या भक्तांची नेहमीं पूजा कर. ( १२३ ) सूत सांगतात, ह्याप्रमाणें श्रीशंकरानीं षण्मुखाला सांगितल्यावर करुणानिधि श्रीशंकरांनां स्कंदांनीं साष्टांग नमस्कार केला. ( १२४ ) हें श्रद्धायुक्त विप्र हो, तुह्मी दान, मान, अर्चनादिकांनीं भक्तीनें शिवभक्तांचें पूजन करा. ( १२५ ) सर्व धर्मांमध्यें उत्तम असा धर्म तुह्मांला मीं सांगितला आहे. हा धर्म शिवप्रेम वाढविणारा आहे व ह्यांत शिवभक्तांचें पूजन हाच मुख्य धर्म कथन केला आहे. ( १२६ ) ह्या धर्मासारखा दुसरा धर्म ह्या जगत्त्रयांत नाहीं. ह्मणून हो द्विज हो, यत्नानें ह्या धर्माचें सदा सर्व काळ आचरण करा. ( १२७ ) सर्व नद्यां-

गिरीणां श्रीगिरिःश्रेष्ठो देवानां प्रवरः शिवः ॥ १२८ ॥ य इदं पुण्यमाख्यानं शृणोत्येकाग्रमानसः ॥ शिवलिंगार्चनाकाले तस्मै शंभुः प्रसीदति ॥ १२९ ॥ पठते श्रावयेद्यस्तु धर्माख्यानमिदं नरः ॥ स त्रिसप्तकुलोपेतः शिवलोके महीयते ॥ १३० ॥ गृहे यस्येदमाख्यानपुस्तकं तिष्ठति ध्रुवम् ॥ तस्यैश्वर्यसमृद्धिः स्यान्नाग्निचोरभयं भवेत् ॥ १३१ ॥

इति स्कान्दे महापुराणे शंकरसंहितायामुपरिभागे शिवभक्तपूजाकथनं नाम पंचाशीतितमोऽध्यायः ॥ ८५ ॥ ७ ॥

---

त गंगा, धर्मांत शैवधर्म, पर्वतांत श्रीपर्वत, देवांत महादेव श्रेष्ठ आहेत. ( १२८ ) शिवलिंगाची पूजा करितांना हें आख्यान जो श्रवण करील त्यावर श्रीशंकर प्रसन्न होतील. ( १२९ ) जो हें आख्यान पठण करील व दुसऱ्यांस ऐकवील त्याच्या २१ पिढ्या उद्धरून शिवलोकास जातील. ( १३० ) ज्याच्या घरीं हें आख्यानाचें पुस्तक असेल त्याचे ऐश्वर्याची वृद्धि होऊन त्यास चोर, अग्नि, इत्यादिकांचें भय प्राप्त होणार नाहीं. (१३१)

याप्रमाणें स्कन्दपुराणांतील शंकरसंहितेपैकीं उपरिभागांतील शिवभक्तांचे पूजेचा ८५ वा अध्याय समाप्त झाला.

---

॥ श्रीशिवाय नमः ॥

* शंकर उवाच.

वक्ष्यामि धृतलिंगस्याचरणं श्रुतिसंमतम् ॥ स्मृतितंत्रपुराणेषु प्रसिद्धं ते समासतः ॥ १ ॥ श्रुत्यागमोदितं धर्मं नित्यनैमित्तिकाश्रयम् ॥ कुर्याल्लिंगांगसंबंधी ब्राह्मणः कामवर्जितः ॥ २ ॥ विध्युक्तकर्मानुष्ठानाच्चित्तशुद्धिर्भवेद्ध्रुवम् ॥ चित्तशुध्द्या भवेद्भक्तिर्भवत्यव्यभिचारिणी ॥ ३ ॥ तया संजायते ज्ञानं नश्यत्यज्ञानमात्मनः ॥ तस्मान्मोक्षस्ततो कर्म विध्युक्तं सम्यगाचरेत् ॥ ४ ॥ तस्मादाचारसहितो भक्तो माहेश्वरो जनः ॥ पूजयेद्गुरुणा दत्तमिष्टलिंगमतन्द्रितः ॥ ५ ॥ पाणिपद्मासने नित्यं त्रिकालं शुद्धमानसः ॥ निस्पृहो निरहंकारः कामक्रोधविवर्जितः ॥ ६ ॥ सत्यं हितं प्रियं काले स्वच्छात्मा योऽभिभाषते ॥ ७ ॥ स याति लो-

---

श्रीशंकर म्हणतात लिंग धारण करणारांचे आचार श्रुतींत व तंत्र इतिहास, पुराणें इत्यादि ग्रंथांत वर्णन केल्याप्रमाणें कसे प्रसिद्ध आहेत तें मी आतां तुला संक्षेपानें सांगतों. ( १ ) लिंगधारी ब्राह्मणानें श्रुतींत वर्णन केल्याप्रमाणें नित्य व नैमित्तिक कर्मांचें आचरण करावें. ( २ ) विधिप्रमाणें कर्म केल्यापासून चित्त शुद्ध होतें, चित्त शुद्ध झालें म्हणजे भक्ति उत्पन्न होते व ती भक्तिही अनन्यभक्ति उत्पन्न होते. ( ३ ) तिच्या योगानें ज्ञान प्राप्त होतें व आत्म्यासंबंधीं अज्ञान नाहींसें होतें. नंतर मोक्ष प्राप्त होतो. म्हणून विधियुक्त कर्म योग्य रीतीनें आचरण करावें. ( ४ ) आचारयुक्त महेश्वरांनीं ( जंगमांनीं ) गुरुंनीं दिलेलें इष्टलिंग तळहातावर घेऊन त्याची ( ५ ) शुद्ध अंतःकरणानें व निरलसपणानें अहंकार सोडून व कामक्रोध टाकून देऊन, दररोज त्रिकाळ पूजा करावी. ( ६ ) जो सद्विचारी नर प्रिय, हितकर इहपरलोक साध्य होण्यास साधक, असें सत्यभाषण थोडक्यांत व प्रसंग पाहून बोलतो, ( ७ ) तो आनंद-

---

* ह्या अध्यायाचे आरंभींचे सूतशौनकादिकांचे प्रश्नोत्तराचे दोन श्लोक मूळग्रंथ लिहिण्याचेवेळीं लेखकांचे नजरचुकीनें राहिले आहेत.

कानाह्लादहेतुभूताननुत्तमान् ॥ यत्तु दृष्टेन्द्रियादृष्टं श्रुतं वा यदि विद्यते ॥ ८ ॥ तदेवोक्तं वदेत्सत्यं सत्यं नैवान्यथा भवेत् ॥ नानृतं कस्यचिद्ब्रूयान्नास्त्यसत्यादघं परम् ॥ ९ ॥ एकतः सर्व पापानि तुलायामेकतोऽनृतम् ॥ ऋषयस्तोलयामासुरनृतं चातिरिच्यते ॥ १० ॥ तस्माच्छिवार्चकोऽसत्यं न ब्रूयाद्धर्मनाशनम् ॥ सर्वस्वहरणे प्राणपरित्यागविवाहयोः ॥ ११ ॥ हरे चरेऽखिलेऽसत्यं यदुक्तं सत्यमेव तत् ॥ अल्पार्थहानिः सोढव्या वैरिणोऽर्थागमं त्यजेत् ॥ १२ ॥ न वैरं रोचयेत्प्राज्ञो राजस्त्रीभक्तसत्तमैः ॥ भक्तानां गणमूर्तीनां प्राणलिंगांगसंगिनाम् ॥ १३ ॥ अतिथीनां द्विजाग्र्याणां प्राज्ञः सन्मानमाचरेत् ॥ सर्वेषामन्नकामानामन्नं दद्याद्यथाबलम् ॥ १४ ॥ अस्नात्वा वै विषं भुंक्ते त्वजप्त्वा पूय-

---

कारक लोकांस जातो. जो दृश्य इंद्रियांनीं ऐकलेले असेल किंवा पाहिलेले असेल ( ८ ) तेंच बोलतो व जो सत्यच ह्मणून सत्य भाषण करितो, त्यानें बोललेले भाषण सत्यच होईल असत्य होणार नाहीं. कोणाबरोबरही असत्य भाषण करूं नये. कारण असत्यासारखें दुसरें मोठें पातक नाहीं. ( ९ ) पूर्वी ऋषींनीं सर्व पापें एका तागडींत व असत्य भाषण हें एका तागडींत घालून त्या दोघांचें वजन केलें तों असत्य भाषणाचें पारडें खालीं आलें व इतर पापांचें वजन असत्याचे वजनापेक्षा कमी भरलें. ( १० ) ह्मणून शिवपूजकानें नेहमीं खरें बोलावें. व धर्मनाशकारक असें असत्य मुळींच बोलूं नये. परंतु विवाहासंबंधीं, एखाद्याचें सर्वस्वी नुकसान होतेवेळीं प्राणसंकटीं किंवा शिवस्वरूपी व पट्टाधिकारी ( ११ ) शिवभक्तांच्या कल्याणाबद्दल बोलतांना खोटें बोललें तरी तें सत्य होतें. अल्प हानि झाली तरी ती सहन करावी व वैऱ्यांची संपत्ति आली तरी ती ग्रहण करूं नये. ( १२ ) राजा, स्त्रिया आणि शिवभक्त यांबरोबर वैर करूं नये. त्याचप्रमाणें प्राणलिंग धारण करणाऱ्या भक्तावरोबर वैर करूं नये. ( १३ ) सूज्ञ मनुष्यानें अतिथि, द्विज आणि अन्नाकरितां येणाऱ्या सर्व मनुष्यांनां यथाशक्ति अन्न द्यावें. ( १४ ) स्नान केल्याशिवाय भोजन केलें तर तें विषवत् होतें. व जप

शोणितम् ॥ अनभ्यर्च्य क्रिमिं भुंक्ते ह्यदत्त्वाऽनिष्टमश्नुते ॥ १५ ॥
भोजयेदतिथिं नित्यमन्नकामं यतीश्वरम् ॥ स केवलमघं भुंक्ते
ह्यतिथेर्भोजनं विना ॥ १६ ॥ अतिथिर्यस्य भग्नाशो गृहात्प्रतिनि-
वर्तते ॥ स तस्मै दुष्कृतं दत्वा पुण्यमादाय गच्छति॥१७॥ अशक्त-
बालवृद्धान्धानाश्रितान्सज्जनानपि ॥ वस्त्रावासान्नपानाद्यैरक्षेच्छ्री-
कण्ठपूजकम् ॥ १८ ॥ सर्वाङ्गोध्दूलनं कुर्याल्लिंगधारी दिने दि-
ने ॥तिर्यक्त्रिपुण्ड्रं भूत्या च रुद्राक्षाणां च धारणम् ॥१९॥ जपेत्पं-
चाक्षरं नित्यं श्रीरुद्राध्यायमुत्तमम् ॥ शिवसंकल्पमखिलं पंचब्र-
ह्माणि भक्तिमान् ॥ २० ॥ शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानाव-
मानयोः ॥ समो भूत्वाऽरिमित्रेषु ततः कुर्याद्यथाविधि ॥ २१ ॥
सुखोदितेषु मैत्रीं च कृपां कुर्यात्सदुःखिषु ॥ पुण्यक्रियेषु मुदिता-

---

केल्याशिवाय भोजन केलें तर रक्त, पू वगैरे भक्षण केल्यासारखें होतें. शिवपूजा केल्याशिवाय भोजन केलें तर कृमि, कीटक भक्षण केल्याप्रमाणें होतें. आणि अन्नदान केल्याशिवाय अन्न भक्षण केलें तर पातक लागतें. ( १५ ) नित्य अन्नार्थि अतिथीला भोजन दिलें तर ईश्वरास अन्न दिल्याचें पुण्य लागतें. आणि अतिथीशिवाय भोजन केलें तर नुसतें तो अन्न भक्षण करितो, एवढेंच नव्हे तर त्यास पातकही लागतें. (१६) एखाद्याचे घरून एखादा अतिथि इच्छा तृप्त झाल्याशिवाय जाईल तर त्या यजमानाला आपलें पाप देऊन व यजमानाचें पुण्य घेऊन, तो अतिथि निघून जातो. ( १७ ) श्रीकण्ठ पूजकानें अशक्त, बालक, वृद्ध, आंधळे, आश्रित लोक व सज्जन इत्यादिकांनां वस्त्र, पात्र, अन्न, वगैरे देऊन त्यांचें रक्षण करावें. ( १८ ) लिंगधारण करणाऱ्यानें प्रतिदिवशीं सर्व आंगाला भस्म लावावें व कपाळावर भस्माचा आडवा त्रिपुंड्र करावा. रुद्राक्ष धारण करावेत. ( १९ ) पंचाक्षरी मंत्र व रुद्राध्याय यांचा नेहमीं जप करावा. व सर्व कांहीं शिवात्मक आहे असें मानावें. आणि पंचब्रह्म मंत्रांचेंही भक्तिपूर्वक चिंतन करावें.(२०)शिवपूजा करावयाची ती शीत आणि उष्ण, सुख आणि दुःख, मान आणि अवमान, मित्र आणि शत्रू, या सर्वांच्या ठिकाणीं सारखीच मनाची स्थिति ठेवून करावी. (२१) सुखामध्यें ज्यांचा

मुपेक्षां पापकारिषु ॥ २२ ॥ परसंतापकारित्वं न कुर्याच्च कदाचन ॥ न हिंस्यात्सर्वभूतानि शिवभक्तिपरायणः ॥ २३ ॥ चिंतितं संततं धीमानिदद्याद्गुरुमूर्तये ॥ गुरौ च देशिके कुर्याद्भक्तिं श्रद्धासमन्वितः ॥ २४ ॥ यदुक्तं गुरुणा प्रीत्या न च तद्विस्मरेद्बुधः ॥ शिवस्थानानि तीर्थानि विशिष्टानि शिवार्चकः ॥२५॥ शिवयात्रोत्सवं नित्यं सेवेत परया मुदा ॥ शिवक्षेत्रोत्सवमहायात्रादर्शनकांक्षिणाम् ॥ २६ ॥ मार्गेऽन्नपानदानादीन् कुर्यान्माहेश्वरो जनः ॥ यो रक्षेच्छंकरक्षेत्रयात्रोत्सवपरान्नरान् ॥ २७ ॥ यत्पुण्यमार्जितं तैश्च तदर्धं स लभेत वै ॥ ("नान्नतोयसमं दानं न चाहिंसापरं तपः ")॥ २८ ॥ तस्मान्माहेश्वरो नित्यमन्नतोयप्रदो भवेत् ॥ लिंगाङ्गसंगिनां पुंसां वेदमार्गोऽवलंबिनां ॥ २९ ॥

---

उदय झालेला आहे त्यांच्या ठिकाणीं मित्रत्व ठेवावें. आणि दुःखी जनांवर कृपा करावी. त्याचप्रमाणें पुण्यवान् जनांला पाहून आनंद मानावा आणि पाप करणाराच्या पापाची उपेक्षा करावी. ( ह्मणजे त्याच्या पापाकडे दुर्लक्ष्य करावें, व त्यांच्याशीं प्रेमानें वागावें. ) ( २२ ) दुसऱ्याला संताप येईल असें कर्म कधींही करूं नये व शिवभक्तानें सर्व भूतांपैकीं कोणाचीही हिंसा करूं नये. ( २३ ) गुरूला नेहमीं आपण जें इच्छितों तें द्यावें व देशिकाच्या ठायीं आणि गुरूचे ठायीं एकनिष्ठ भक्ति ठेवावी. ( २४ ) गुरूनें प्रीतीनें जें सांगितलें असेल त्याचा विसर पडूं देऊं नये. ( २५ ) परम प्रीतीनें शिवयात्रांसंबंधीं उत्सव जेथें असतील तेथें जावें व शिवयात्रा, व शिवक्षेत्रें यांचे ठिकाणीं जाणारास वाटेंत अन्न पाणी वगैरे द्यावें. ( २६ ) जो लिंगधारी शिवक्षेत्रांस जाणाऱ्या जनांचें रक्षण, वाटेंत अन्न, पाणी वगैरे देऊन करितो. ( २७ ) त्यास यात्रेकरूंच्या पुण्यापैकीं अर्ध पुण्य प्राप्त होतें. खरें ह्मटलें तर जल आणि अन्न यांच्या दानासारखें दुसरें दान नाहीं. व अहिंसेसारखें दुसरें तप नाहीं. ( २८ ) ह्मणून शिवभक्तांनीं वेदमार्गाप्रमाणें चालणाऱ्या व लिंगधारण करणाऱ्या मनुष्यांस नित्य जल आणि अन्न यांचें दान करावें. ( २९ )

कुले उपेयात्स्वां भार्यां न पश्येत्परयोषितम् ॥ पापानां च समस्तानां परदारगमोऽधिकः ॥ ३० ॥ परदारान्न पश्येच्च मनसा च कदाचन ॥ तस्मात्परस्त्रीसंसर्गं परस्त्रीदर्शनं त्यजेत् ॥ ३१ ॥ श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ॥ स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३२ ॥ न स्वधर्मं त्यजेत्प्राज्ञः कायेन मनसा गिरा ॥ यावन्न हरति प्राणान्मृत्युर्गंधमिवानिलः ॥ ३३ ॥ तावद्वेदाश्रयं धर्मं कुर्यात्प्राज्ञः समाहितः ॥ आयुःकालक्रमाद्याति शरीरान्तरसंस्थितम् ॥ ३४ ॥ भिन्नकुम्भादिव जलं तस्माद्धर्मं समाश्रयेत् ॥ गलत्युपघनात्पुंसो यौवनं पापभाजनम् ॥ ३५ ॥ कुनृपस्य यदैश्वर्यमविचारपरस्य च ॥ यौवनं गुणसंपत्तिः शिवभ-

---

सत्कुलांतील कन्येला आपली भार्या करावी. व परस्त्रीकडे वाईट हेतूनें पाहूंही नये. कारण सर्व पापांमध्यें, दुसऱ्याच्या बायकोवर दृष्टि ठेवणें, हें फार अघोर पातक आहे. असें गणलें आहे. ( ३० ) मनांतसुद्धां कधींही परदारेचा विचार आणूं नये ह्मणून दुसऱ्याच्या स्त्रीचा सहवास आणि दुसऱ्याच्या स्त्रीचें दर्शन हीं वर्ज्य करावींत. ( ३१ ) दुसऱ्याचा धर्म चांगला असला तरी व आपला धर्म वाईट आहे असें आपणांस वाटलें तरी, आपलाच धर्म पुण्यकारक आहे. आपल्या धर्मांत मरण येईल तरी बरें. कारण दुसऱ्याचा धर्म चांगला असला तरी शेवटीं तो भयावहच होय. ( ३२ ) मन, वाणी किंवा शरीर या तिहींपैकीं एकानेंही आपला धर्म आपण सोडूं नये. व वारा ज्याप्रमाणें सुगंध हरण करितो त्याप्रमाणें मृत्यूनें आपले प्राण हरण केले नाहींत तोंपर्यंत धर्म आचरण करावा. ( ३३ ) शरीरांत असलेलें आयुष्य कालावधीनें नाहींसें होईपर्यंत सूज्ञ मनुष्यानें मनःपूर्वक वेदसिद्ध धर्माचें आचरण करावें. ( ३४ ) आयुष्य हें फुटलेल्या मडक्यांतील पाण्याप्रमाणें क्षणभंगुर आहे व पापाचें साधनीभूत असें हें तारुण्य, त्या फुटक्या भांड्यांतून विशेष जलद गळत आहे. ह्मणून सूज्ञ मनुष्यांनीं तारुण्यांत सुद्धां स्वधर्माचा आश्रय करावा. ( ३५ ) अविचारी राजाचें ऐश्वर्य जसें क्षणभंगुर तसें शिवभक्ताचें यौवन व यौवनसंबंधीं

क्तजनास्पदम् ॥ ३६ ॥ दुर्लभं विनयावासमिहाकाशे वनं यथा॥ यावद्धनसमृद्धिः स्याद्यावदिंद्रियपाटवम् ॥ ३७ ॥ तावन्माहेश्वरं धर्ममाश्रयेद्विधिचोदितम् ॥ न पुत्रा बांधवा दाराः सहागच्छन्ति गच्छता ॥ ३८ ॥ पुंसा लोकान्तरं यातो धर्माधर्मावुभौ ध्रुवम् ॥ गृण्हाति भूतभुग्देहं दारान्जारो धनादिकम् ॥३९॥पुत्रादयो नरस्य द्वौ धर्माधर्मौ न कश्चन॥उरस्थलं ताडयन्तो रुदन्तो बान्धवाः शवम् ॥ ४० ॥ दग्ध्वा पितृवने स्नात्वा निवर्तन्ते गृहान् प्रति ॥ तत्र ते भुञ्जतेऽन्नानि घृताक्तानि यथासुखम् ॥४१॥ कर्मेदं कर्मकर्मेदमाख्यया बुद्धिहीनता॥लोकान्तरं न जानन्ति मनुष्याः पापकर्मिणः ॥ ४२ ॥ पुंसो लोकान्तरं यावन्न च कर्म शुभाशुभम्॥ तस्मात्सुखमिहामुत्र यदत्यायाससाधकम् ॥४३ ॥ स्वजातिविहितं

---

गुण होत. ( ३६ ) आकाशांत ज्याप्रमाणें अरण्य नसतें, तसें यौवनामध्यें विनयादि गुण नसतात. जों पर्यंत पुष्कळ धन असतें व जोंपर्यंत हस्तपादादि इंद्रियें सुदृढ असतात, (३७) तोंपर्यंत शास्त्रोक्त शैव धर्माचा आश्रय करावा. जीव शरीर सोडून जातांना पुत्र, बांधव, स्त्रिया वगैरे त्याजबरोबर येत नाहींत. ( ३८ ) मनुष्य जेव्हां परलोकास जातो तेव्हां त्याजबरोबर धर्म आणि अधर्म हें दोघेच बांधव जातात. त्याच्या स्थूल देहास अग्नी भक्षण करितो. व स्त्रियांदिकांकडे जार लक्ष्य ठेवून त्यांस ग्रहण करितात. धनादि त्याचे मुलगे घेतात. ( ३९ ) आत्म्याचे धर्म आणि अधर्म यांचा वांटेकरी कोणी होत नाहीं. स्थूल देहासंबंधीं बांधव देहांतून जीव निघून गेल्यावर रुदन करीत करीत, त्या जीवाचें शरीर ( ४० ) स्मशान भूमीवर नेऊन जाळून टाकितात आणि स्नान करून परत येतात. घरीं परत आल्यावर घृत पायसयुक्त अन्न सुखानें खातात. ( ४१ ) पापीजनांस परलोकची स्थिति समजत नाहीं. अशी बुद्धि त्यांस प्राप्त होण्यास कारण त्यांचें कर्मच होय. खरोखरच कर्म होय. ( ४२ ) मनुष्यप्राणी जोपर्यंत अशुभ कर्म कोणतें हें जाणून व त्याचा त्याग करून शुभ कर्म आचरण करितो तेव्हांच त्याला शुभ लोक प्राप्त होतात. ह्मणून जें कर्म अति श्रमसाध्य असतें तेंच इहलोकीं व परलोकीं सुखदायक होतें. (४३) वेदांत

धर्मं कुर्याद्वेदोदितं नरः ॥ स्वजातिविहिताद्धर्माद्वेदतंत्रोदितात्कृतात् ॥ ४४ ॥ पुंसः पापनिवृत्तिः स्यात्तया शुद्धिस्तु चेतसः ॥ चित्तशुध्या तु विश्वासः श्रुतिस्मृतिषु जायते ॥४५॥ तस्माद्भक्तिर्भवेत्पुंसः शिवे परमकारणे ॥ भक्त्या जायेत सततं संसृतेर्दोषदर्शनम् ॥ ४६ ॥ तस्मादिहापरत्रापि भोगेषु विरतिर्भवेत् ॥ तया वेदान्तवाक्यार्थे शिवरूपप्रकाशकम् ॥ ४७ ॥ सम्यग्ज्ञानं भवेत्तेन मुक्तिः पुंसो भवेद्ध्रुवम् ॥ तस्मान्माहेश्वरो विप्रः श्रुतिस्मृत्यागमोदितम् ॥ ४८ ॥ वर्णाश्रमोदितं धर्मं प्राणत्यागेऽपि न त्यजेत् ॥ प्राणलिंगांगसंबंधी वीरमाहेश्वरो जनः ॥ ४९ ॥ नान्यदेवोपभुक्तं तु भुञ्जीयात्पार्वतीधवात् ॥ स्वयं लिंगांगसंबंधी शिव एव नचापरः ॥ ५० ॥ तस्मादन्योपभुक्तान्नमन्यपादोदकं त्यजेत् ॥ लि-

---

सांगितलेला धर्म प्रत्येक मनुष्यानें आपापल्या जातीप्रमाणें आचरण करावा. ( ४४ ) कारण आपापल्या जात्यनुरूप व वेदतंत्र इत्यादिकांत सांगितलेला धर्म आचरिल्यापासून मनुष्याचें पाप नाहींसें होतें. पाप नाहींसें झाल्यानें चित्त शुद्ध होतें, व चित्त शुद्ध झाल्यानें श्रुति--स्मृति ग्रंथांचें ठायीं विश्वास उत्पन्न होतो. त्या विश्वासापासून श्रेष्ठ अशा शंकराच्या ठायीं दृढभक्ति उत्पन्न होतें. ( ४५ ) भक्ति उत्पन्न झाल्यानें संसारांतील नानाप्रकारचे दोष दिसूं लागतात. दोष दिसल्यावर ( ४६ ) इहलोक आणि परलोक या दोनही लोकांतील सुखाची क्षणिकता दिसून येते. व त्यामुळें वैराग्य उत्पन्न होतें. वैराग्यापासून शिवरूप प्रकाशित करणाऱ्या वेदांत वाक्यांचा अर्थ समजूं लागतो. ( ४७ ) व वेदांत वाक्यांचा अर्थ समजल्यापासून सत्यज्ञान प्राप्त होतें. आणि सत्य ज्ञानापासून मनुष्याला मुक्ति प्राप्त होते. ( ४८ ) ह्मणून माहेश्वरविप्रांनीं ( जंगमांनीं ) श्रुति स्मृति आणि आगम यांत सांगितलेल्या वर्णाश्रम धर्माचा प्राणांतीं सुद्धां त्याग करूं नये. ( ४९ ) प्राणलिंग धारण करणारा वीरमाहेश्वर [जंगम] यांनीं पार्वतीपति शंकराशिवाय इतर देवांना दाखविलेला नैवेद्य ग्रहण करूं नये. कारण स्वतः लिंगधारण केलें असल्यानें ते शिवरूपच होत. ( ५० ) ह्मणून दुसऱ्यानें ग्रहण केलेलें अन्न आणि दुसऱ्याचें

गांगसंगिनो देहे शिवःसम्यग्प्रकाशते ॥ ५१ ॥ ततोऽत्रान्यसुरो-
च्छिष्टमन्यपादोदकं त्यजेत् ॥ अतो लिंगाङ्गसंबंधी न भुञ्जी-
यात्कदाचन ॥ ५२ ॥ नान्यदेवोपभुक्तान्नं नान्यपादोदकं पि-
बेत् ॥ प्राणलिंगांगसंबंधी पादप्रक्षालितं जलम् ॥ ५३ ॥ लिंगां-
गसंगरहितः पिबेत्तत्स्य पुण्यदम् ॥ लिंगांगसंगी चेन्मर्त्यः पिबेद
नवधानतः ॥ ५४ ॥ अन्यांघ्रिक्षालितं पाथो नरकं प्रतिपद्यते ॥
चरपादोदकं नित्यं निवेद्य शिवपूजने ॥ ५५ ॥ गुरूच्छिष्टप्रसादं तं
भुञ्जीयाद्भक्तिनम्रधीः ॥ स्वजात्याश्रमधर्मं यस्त्यक्त्वा वेदोदितं
नरः ॥ ५६ ॥ अन्यजात्युचिताचारं चरेत्स पतितो भवेत् ॥ मु-
हूर्तमपि जीवेत नरः शुक्लेन कर्मणा ॥ ५७ न च वर्षशतेनापि नरः
कृष्णेन कर्मणा ॥ धर्मं यो बाधते धर्मो न तत्सद्धर्म ईरितः ॥५८॥

---

पादोदक घेऊं नये. कारण लिंगधारण करणाऱ्या मनुष्याच्या शरीरांत शिवरूपाचा उत्तम प्रकाश पडतो. ( ५१ ) यामुळें दुसऱ्या देवांचें उच्छिष्ट किंवा दुसऱ्या देवांचें पादोदक लिंगधारी मनुष्यानें कधींही घेऊं नये. ( ५२ ) अन्य देवतेनें भक्षण केलेलें अन्न व दुसऱ्या देवतेचें पादोदकही लिंगधारी मनुष्यानें घेऊं नयेत. लिंगधारी जंगमाचे पाय धुवून घेतलेलें पाणी ( ५३ ) ज्यानें लिंगधारण केलें नाहीं तो जर पिईल तर त्यास पुण्य लागेल. आणि लिंगधारण केलेला जरी कोणी असेल तरी त्यानें लिंगधारणाचें पादोदक न चुकतां ( निःसंशय ) घ्यावें. (५४) दुसऱ्याचें पादोदक जर ग्रहण केलें तर तो लिंगधारक नरकाला जाईल. चरमूर्ति जे शिवभक्त यांच्या पादोदकाचा नेहमीं शिवपूजा करितांना शिवास नैवेद्य दाखवावा. ( ५५ ) प्रेमानें गुरूनें उष्टा केलेला प्रसाद भक्षण करावा. आपल्या जातीचा जो आश्रमधर्म सांगितला आहे तो टाकून देऊन ( ५६ ) दुसऱ्या जातीनां योग्य असलेला आचार जो करील तो भ्रष्ट होईल. मनुष्यानें शुद्ध कर्म करून एक मुहूर्तभर जीवंत राहणें चांगलें, ( ५७ ) परंतु वाईट कर्म करून शंभर वर्षें जगलें तरी व्यर्थ होय. ज्या धर्मापासून इतर धर्मांस पीडा होते, तो सद्धर्म नव्हे. (५८)

अविरोधी तु यो धर्मः स धर्मः सद्भिरुच्यते ॥ कर्मणा मनसा वाचा यदिहामुत्र सौख्यदम् ॥ ५९ ॥ तत्कुर्वन्नुभयत्रापि न हीयेत शिवार्चकः ॥ स्वजातिविहितं धर्मं विनिंद्यमपिचेतरैः ॥ ६० ॥ इहामुत्र सुखाकांक्षी कुर्वीत मनुजः सदा ॥ अध्यापनं चाध्ययनं दानं यजनयाजने ॥ ६१ ॥ प्रतिग्रहो ब्राह्मणानां षट् कर्माणि प्रचक्षते ॥ दानमध्ययनं यज्ञकर्माणि राजन्यवैश्ययोः ॥ ६२ ॥ शस्त्राजीवो मही रक्षाप्यपलायनमाहवे ॥ क्षत्रियाणामयं धर्मः स्वधर्मश्चानुयायिनाम् ॥ ६३ ॥ कृषिवाणिज्यगोरक्षा धर्मोऽयं सहजो विशाम् ॥ शूद्राणां द्विजशुश्रूषारतानां कामकर्म च ॥ ६४ ॥ स्वजातिविहितं धर्मं कुर्वन्तः पूजयन्ति ये ॥ भक्त्या श्रीकण्ठमनिशं तेऽपि माहेश्वराः स्मृताः ॥ ६५ ॥ विध्युक्तं कर्म तूत्सृज्य स्वजातिविहितं नरः ॥ येऽर्चयन्ति शिवं तेषां पूजां गृण्हाति नो शिवः ॥ ६६ ॥ वर्णाश्रमस-

---

ह्मणून जो धर्म दुसऱ्या धर्मांना आड येत नाहीं, त्यासच, सज्जन, धर्म असें ह्मणतात. याकारितां इहलोकीं आणि परलोकीं सुख देणारा असा धर्म कर्मानें, मनानें किंवा वाचेनें सोडूं नये. ( ५९ ) इतरांनीं जरी निंदा केली तरी आपल्या जातीला योग्य असा व उभय लोकांत सुखदायक असा धर्म शिवपूजकांनीं सोडूं नये. ( ६० ) इहलोकीं सुख मिळावें ह्मणून ब्राह्मणांनीं स्वतः शिकावें, दुसऱ्यांस शिकवावें, दान द्यावें, दान घ्यावें, यज्ञ करावा, यज्ञ करवावा. ( ६१ ) अशीं सहा कर्में ब्राह्मणांचीं होत. यांपैकीं दान देणें, अध्ययन करणें, आणि यज्ञ करणें, हीं तीन कर्में क्षत्रिय व वैश्य यांचीं होत. ( ६२ ) शस्त्रधारणावर उपजीविका, भूमीचें रक्षण आणि युद्धांतून पळून न येणें हा धर्म क्षत्रियांचा होय. ( ६३ ) शेतकी, व्यापार, गाईचें रक्षण, हा वैश्यांचा धर्म होय. व द्विजांची सेवा करणें हा शूद्रांचा धर्म होय. ( ६४ ) जे आपापल्या जातींनां योग्य असे धर्म करून भक्तीनें श्रीशंकरांची पूजा करितात त्यांनां माहेश्वर असें ह्मणतात. ( ६५ ) आपापल्या जातींना योग्य असें कर्म व विधियुक्त कर्म सोडून जे शंकरांची पूजा करितात त्यांची पूजा श्रीशंकर ग्रहण करीत नाहींत. ( ६६ ) पूर्वीं श्रीशंकरांनीं वर्णाश्रम धर्माचे आचार कथन केले आहेत.

दाचाराः शिवेन कथिताःपुरा ॥ एतानुल्लंघ्य वर्तन्ते शिवस्याज्ञापलापिनः ॥ ६७ ॥ राजाज्ञाभंगकर्तॄणां दण्डो हि नरकस्तथा ॥ सांवेन शंभुनाज्ञप्तं धर्मं त्यक्त्वाऽर्चयेच्छिवम् ॥ ६८ ॥ यस्तस्मै कुप्यति शिवः स्वाज्ञाभंगविधायिने ॥ चोदनालक्षणं धर्मं शिवेनाज्ञप्तमत्यजन् ॥ ६९ ॥ शंकरं पूजयेद्यस्तु तस्मै सांवः प्रसीदति ॥ प्रसन्ने सति देवेशे महानन्दे सदाशिवे ॥ ७० ॥ दुष्करं किमु मर्त्यस्य त्रिषु लोकेषु विद्यते ॥ महादेवे महानंदे महाकारुणिकोत्तमे ॥ ७१ ॥ प्रसन्ने सति कीटो वा पतंगो वा विमुच्यते ॥ तस्मात्प्रसादसिध्यर्थं शिवस्य परमात्मनः ॥ ७२ ॥ आप्नोति वेदतंत्रोक्तं नित्यकर्माचरेत्सुधीः ॥ कर्म वेदोदितं त्यक्त्वा तंत्रोदितमथाश्रितः ॥ ७३ ॥ पूजयेत्त्र्यंबकं यस्तु स राजस इति स्मृतः ॥ श्रुतितंत्रोदितं धर्मं नित्यनैमित्तिकाश्रयम् ॥ ७४ ॥ कृत्वाऽर्चयति

---

हे आचार उल्लंघन करून, जे वागतात ते शंकरांची आज्ञा मोडतात. असें होतें. (६७) राजाज्ञेचा भंग करणाऱ्यांना जसा दंड होतो, तसा शंकरांची आज्ञा मोडणारांस नरकवास हाच दंड होय. शंकरांनीं कथन केलेल्या रीतीनें जो पूजा न करील (६८) त्यावर आपल्या आज्ञेचा भंग केल्यामुळें श्रीशंकर रागावतात. शिवांनीं सांगितलेला स्फूर्तिरूप धर्म न सोडून (६९) शंकरांची जो पूजा करील त्यावर शंकर प्रसन्न होतात. आणि शंकर प्रसन्न झाले असतां (७०) ह्या लोकत्रयांत दुर्मिळ अशी कोणतीच वस्तु नाहीं. शंकर प्रसन्न झाले असतां (७१) कीटक पतंग सुद्धां मुक्त होतात. ह्मणून शंकरप्रसाद प्राप्त, होण्याकरितां शिवपूजा करावी. (७२) वेद. तंत्र, आदि ग्रंथांत सांगितलेले आचार नेहमीं आचरण करावेत. तसें केलें तर वेदतंत्रोक्त फळ प्राप्त होईल. वेदांत सांगितलेलें कर्म सोडून तांत्रिक ( रुद्रयामल, डामर, ब्रह्मयामल, इत्यादि तंत्रांतसांगितलेल्या ) कर्मानें (७३) त्र्यंबकेश्वराची जे पूजा करितात त्यांस राजसगुणी लोक असें ह्मणतात. श्रुति, तंत्र, वगैरे वैदिक ग्रंथांत वर्णन केल्याप्रमाणें जे लोक आपापलीं नित्य नैमित्तिक कर्में आचरण करून (७४) शंकरांची पूजा

यः शंभुं स भक्तः सात्विकः स्मृतः ॥ यः सात्विको लिंगधारी वि-
धिवन्नित्यकर्मकृत् ॥ ७५ ॥ नीलकंठस्य देवस्य प्रियो भक्तः स
मे प्रियः ॥ एकस्मिन्दिवसे यस्य नित्यकर्मच्युतिर्भवेत् ॥ ७६ ॥
स पंचाक्षरसाहस्रं जपेत्तत्पापशान्तये ॥ मासे नित्यक्रियाहानि-
र्यस्य पुंसोऽभिजायते ॥ ७७ ॥ प्रायश्चित्तेन महता शुद्धिप्राप्नोत्य-
नापदि ॥ संवत्सरं क्रियाहानिर्यस्य मर्त्यस्य जायते ॥ ७८ ॥ त-
स्यावलोकनात्सूर्यो निरीक्ष्यः साधुभिःसह ॥ तस्मात्कालोचितां
नित्यक्रियां नैमित्तिकाश्रयाम् ॥ ७९ ॥ कुर्वीत वेदागमोक्तां गृही
माहेश्वरो जनः ॥ शिवोक्तां जातिमर्यादां योऽतीत्य भुवि वर्तते
॥ ८० ॥ स पाषण्ड इति ज्ञेयः सर्वकर्मबहिष्कृतः ॥ भिनत्ति वेद-
मर्यादां स्वजात्याश्रमगोचराम् ॥ ८१ ॥ आश्रयत्यन्यधर्मांश्च
यः स पाषण्ड उच्यते ॥ ये श्रुत्यागममर्यादां स्वजात्याश्रमगोच-

करितात, त्यांस सात्विक भक्त असें ह्मणतात, लिंग धारण करणारा जो सात्विक मनुष्य आपलें कर्म विधीप्रमाणें करितो, ( ७५ ) तो नीलकंठ देवाचा प्रिय भक्त होय. ज्याचीं वरील प्रमाणें नित्यकर्मे एक दिवस चुकतिल ( ७६ ) त्यानें पापप्रक्षालनार्थ ५००० पंचाक्षरी मंत्राचा जप करावा. व ज्या मनुष्याचीं नित्यकर्मे सहजासहजीं, संकट नसतां, एक महिनाभर बंद राहतात, ( ७७ ) त्याच्या पापाचा परिहार मोठें प्रायश्चित्त घेतल्याशिवाय होत नाहीं. व ज्या पुरुषाचीं कर्मे एकवर्षपर्यंत बंद राहतात, ( ७८ ) त्याचें जर दर्शन झालें तर साधुजनांसह सूर्यदर्शन घ्यावें लागतें, इतका तो पापी असतो. ह्मणून नित्यनैमित्तिक कर्मे ज्या त्या वेळींच करावींत. ( ७९ ) माहेश्वरांनीं ( जंगमानीं ) गृहस्थाश्रम स्वीकारिल्यास वेदादिग्रंथांत सांगितलेलीं कर्मे आचरण करावींत, जो मनुष्य शंकरांनीं वर्णन केलेली जातिमर्यादा सोडून वागतो,(८०) तो नास्तिक समजावा. कारण, त्यानें सर्व कर्मे सोडून दिलेलीं असतात. आपापल्या जातीला व आश्रमाला योग्य असलेली क्रिया सोडून वेदमर्यादाही जो सोडतो व ( ८१ ) अन्य धर्म स्वीकारितो त्याला पाषंड ह्मणावें. व श्रुति, आगम, यांची मर्यादा जो सोडतो व आपल्या जाति व आश्रम यांची मर्या-

राम् ॥ ८२ ॥ त्यजन्ति तेषां पंक्तौ यो भुंक्ते पापिष्ठ एव सः ॥ वेदोदिताचारहीनैर्निषिद्धाचरणप्रियैः ॥ ८३ ॥ संसर्गं कुरुते मर्त्यो यः स पाषण्ड उच्यते ॥ तस्माल्लिंगांगसंबंधी नित्यनैमित्तिकाश्रयम् ॥ ८४ ॥ कर्म वेदोदितं कृत्वा शिवलिंगं समर्चयेत् ॥ संस्कृतं गुरुणा दत्तमिष्टलिंगमतंद्रितः ॥ ८५ ॥ विन्यस्य वामहस्ताब्जे सावधानः प्रपूजयेत् ॥ प्रमादात्पतिते लिंगे प्रायश्चित्तमथाचरेत् ॥ ८६ ॥ आगमोक्तप्रकारेण तद्दोषविनिवृत्तये ॥ श्रुतिस्मृतिपुराणज्ञान्वीरमाहेश्वरान् जनान् ॥ ८७ ॥ लिंगांगसंगिनः शान्तान् भस्मरुद्राक्षधारिणः ॥ तेषां तु पुरतः स्वर्णमेकं संस्थाप्य शुद्धधीः ॥ ८८ ॥ ततो विज्ञापयेदेवं लिंगपाते द्विजः शुचिः ॥ प्रमादान्मम हस्ताब्जात्पतितं लिंगमिष्टकम् ॥ ८९ ॥ यूयं वदत मे प्रायश्चित्तं तद्दोषशान्तये ॥ तच्छ्रुत्वा वचनं तस्य वीरमाहेश्वरा द्विजाः ॥ ९० ॥ यद्वदन्ति मुनिश्रेष्ठाः प्रायश्चित्तं तदाचरेत् ॥ प्र-

दाही (८२) सोडतो त्याच्या पंक्तीला जो बसतो, तोही पापी समजावा. वेदप्रतिपादित आचार सोडून निषिद्ध (वाईट) आचार ज्यांस प्रिय असतात त्यांच्याशीं (८३) जो सहवास ठेवितो, त्यालाही पाखंडी ह्मणावें. ह्मणून लिंग धारण करणाऱ्या मनुष्यानें नित्य कर्म आणि नैमित्तिक कर्म करून (८४) गुरूनें संस्कार करून दिलेल्या इष्ट शिवलिंगाची पूजा वैदिक कर्मानें करावी. (८५) तें लिंग डाव्या हातावर घेऊन सावधानपणानें त्याची पूजा करावी. चुकून जर लिंग खालीं पडलें तर प्रायश्चित्त घ्यावें. (८६) लिंग खालीं पडून उत्पन्न झालेल्या दोषांचें निवारण करण्याकरितां श्रुति, स्मृति, पुराणें, जाणणारे लिंगधारी व भस्म रुद्राक्ष धारण केलेले (८७) वीरमाहेश्वर (जंगम) बोलावून त्यांचे पुढें एक तोळा किंवा आपल्या शक्तीप्रमाणें गुंजप्रमाण सोनें ठेऊन (८८) त्याची शुद्ध अंतःकरणानें प्रार्थना करावी कीं, माझ्या हातून इष्टलिंग खालीं पडलें. (८९) तेव्हां भो विप्रहो, हा दोष जाण्याकरितां प्रायश्चित्त काय केलें पाहिजे हें मला सांगा. व ही प्रार्थना ऐकून जंगमांनीं (वीरमाहेश्वर ब्राह्मणांनीं) (९०) जें जें प्रायश्चित्त सांगितलें असेल तें तें आचरण करावें (घ्यावें.)

णम्य दण्डवद्भूमौ तेभ्यो भक्त्या यथाबलम् ॥ ९१ ॥ मण्डनानि धनं धान्यं गां वस्त्राणि निवेदयेत् ॥ दत्वा विभूतिताम्बूलं तान्क्षमाप्य द्विजोत्तमान् ॥ ९२ ॥ अन्येभ्यः शिवभक्तेभ्यो दत्वा शक्त्या च दक्षिणाम् ॥ सहस्रं भोजयेत्पश्चाच्छतं वा लिंगधारिणाम् ॥ ९३ ॥ माहेश्वराणां मतिमान् स साज्यापूपपायसैः ॥ पूजयेत्प्रथमं तत्र गुरुं सर्वज्ञविग्रहम् ॥ ९४ ॥ धनधान्यैरलंकारैर्लिंगपाते द्विजो मुदा ॥ ततःपूतो भवेन्मर्त्यो लिंगपातोत्थदोषतः ॥ ९५ ॥ पूर्वोक्तेन प्रकारेण भवेल्लिंगांगसंगवान् ॥ आगमोक्तेन मार्गेण गुरुणा दत्तमिष्टकम् ॥ ९६ ॥ लिंगं संपूजयेद्यस्तु कृतकृत्यो भवेत्पुमान् ॥ एवं स्वजातिविहितं धर्मं वेदागमेरितम् ॥९७॥ यः प्राणलिंगसंबंधी कुर्यात्सुज्ञानवान् भवेत् ॥ लिंगांगसंगी सततमेवमाचारवांश्छिवम् ॥ ९८ ॥ योऽर्चयेद्यावदायुष्यं तस्य जन्म न विद्यते ॥ इममाचारमुत्सृज्य योऽन्यथा वर्तते पुमान् ॥ ९९ ॥ माहेश्वरःस संसारे जायते म्रीयते क्वचित् ॥ सर्वमुक्तं समासेन मा-

व त्यांस भक्तिपूर्वक साष्टांग नमस्कार करावा. ( ९१ ) व त्यांस धन, धान्य, वस्त्रें व गाई, अलंकार, वगैरे अर्पण करावेत. त्यांस भस्म, विडा, वगैरे देऊन त्यांची क्षमा मागावी. ( ९२ ) . त्याचप्रमाणें दुसऱ्या शिवभक्तांनां यथाशक्ति दक्षिणा द्यावी व लिंगधारण करणारे जंगम १००० अगर १०० जेऊं घालावेत. ( ९३ ) व जंगमांस वाढण्याच्या आधीं त्यांच्या सर्वज्ञ गुरूची पूजा करून दूध, तूप, आनारसे, वगैरे पदार्थ त्यांस समर्पण करावेत. ( ९४ ) व धन, धान्य, अलंकारही त्यांस द्यावेत. असें केलें तर लिंग खालीं पडल्यामुळें उत्पन्न झालेल्या दोषांचें निवारण होतें. ( ९५ ) मग पूर्वीं सांगितलेल्या रीतीनें व आगमांत सांगितल्याप्रमाणें गुरूनें पुनः संस्कार करून दिलेलें इष्टलिंग पुनः धारण करावें. (९६) याप्रमाणें जो लिंगपूजा करील तो कृत्यकृत्य होईल. व वेद आगमांत सांगितलेलें आपल्या जातीला योग्य असें कर्म ( ९७ ) जो प्राणलिंग धारण करणारा सतत आचरण करील (९८) त्याला पुनर्जन्म प्राप्त होणार नाहीं. हा आचार सोडून जो अन्य रीतीनें वागतो, ( ९९ ) तो पुनः

हेश्वरजनोचितम् ॥ १०० ॥ नित्यनैमित्तिकं कर्म श्रुतिस्मृत्युदितं तथा ॥ श्रुत्वा शिवमुखोद्गीतं वर्णाश्रमसमाश्रयम् ॥ १०१ ॥ वेदसिद्धं महाधर्मं स्कन्दस्तृप्तोऽभवद्भृशम् ॥ भवन्तोऽपि मुनिश्रेष्ठाः शिवतुष्ट्यर्थमादरात् ॥ १०२ ॥ तृप्तिमद्धर्ममखिलं पूजयन्तु सदाशिवम् ॥ य इदं शृणुयान्नित्यमध्यायं शिवभक्तिमान् ॥१०३॥ शिवलिंगार्चनाकाले स सम्यग्ज्ञानवान्भवेत् ॥

इति स्कान्दे महापुराणे शंकरसंहितायामुपरिभागे माहेश्वरस्य लौकिकचर्याकथनं नाम षडशीतितमोऽध्यायः ॥

---

संसारांतील जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडतो. हे षडानना, माहेश्वर जनांस योग्य अशीं कर्मे सारांशानें तुला सांगितलीं आहेत. ( १०० ) वेदश्रुति, स्मृति, वगैरे ग्रंथांतून वर्णन केलेलें व श्रीशिवांनीं निवेदन केलेलें नित्य नैमित्तिक व वेदशुद्ध कर्म स्कंदांनीं श्रवण करून ( १०१ ) ते फार संतुष्ट झाले. हे मुनिश्रेष्ठ हो, तुह्मीही शंकरांच्या मनास आनंद देण्याकरितां आदरानें (१०२) श्रीशंकरांची पूजा करा. हाच धर्म संतोषप्रद आहे. हा अध्याय जो भक्तिमान् शैव शिवलिंग पूजा करण्याचे वेळीं श्रवण करील त्यास योग्य व सत्य ज्ञान प्राप्त होईल. ( १०३ )

याप्रमाणें स्कंदपुराणांतील शंकर संहितेंतील वरच्या भागांतील माहेश्वराच्या ( जंगमाच्या ) लौकिकाचारांबद्दलचा ८६ वा अध्याय समाप्त झाला. श्रीरस्तु.

श्रीशंकरसंहितायां वीरमाहेश्वरप्रकरणं समाप्तम्.

